








नोंदणी क्र. एफ.१६०१४(मुंबई)

महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,

धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १४ वें ] नोव्हेंबर १९६० [ अंक २



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका










# मेट्रिक पद्धति

## कस्टम्स आणि सेंट्रल एक्साईजच्या क्षेत्रात



मेट्रिक वजनामापांची पद्धति कस्टम्स आणि सेंट्रल एक्साईजच्या क्षेत्रात ................पासून लागू होत आहे. मालावर आकारण्याच्या जकातीचे/करांचे दर त्या तारखे नंतर मेट्रिक परिमाणांत दाखविले जातील.

चालू असलेले दर त्यांच्या अगदी शक्य तितक्या बरोबरीच्या मेट्रिक परिमाणांत बदलण्यात येतील.

# मेट्रिक पद्धति

साम्य व सरलतेसाठीं

भारत सरकार द्वारा प्रकाशित

DA-60/390




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष चौदावें
अंक दुसरा

नोव्हेंबर
१९६०

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत-श्री. हरि कृष्ण मोहनी-प्रा. वि. म. बेडेकर

प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( ज. सातारा )

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| (१) | धर्मकोश- व्यवहारकाण्ड | भाग १ ते ३ | | | किंमत |
| | साधी बांधणी ... | ... | ... | | ५२-०-० |
| | कापडी बांधणी ... | ... | ... | | ६४-०-० |
| (२) | धर्मकोश - उपनिषत्काण्ड | भाग १ ते ४ | | | |
| | साधी बांधणी ... | ... | ... | | ११०-०-० |
| | कापडी बांधणी ... | ... | ... | | १२६-०-० |
| (३) | धर्मकोश- संस्कारकाण्ड | भाग १ ला | .... | | ४५-०-० |
| (४) | मीमांसादर्शन ... | ... | ... | ... | ३०-०-० |
| (५) | मीमांसाकोश ... | भाग १ ते ४ | | | १३५-०-० |
| (६) | कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | ... | ... | | ६-०-० |
| (७) | हिंदुधर्माची समीक्षा ( लक्ष्मणशास्त्री जोशी ) | ... | | | ५-०-० |
| (८) | वैदिक संस्कृतीचा विकास ... | .. | ... | | ६-०-० |
| (९) | नवमानवतावाद ... | ... | ... | ... | २-८-० |
| (१०) | मानवाचा आदर्श ... | ... | ... | ... | ३-०-० |
| (११) | चार्वाक- इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | ... | | | ३-०-० |
| (१२) | गीता-प्रवेश ( डॉ. गो. वि. देवस्थळी ) | ... | | | २-८-० |
| (१३) | छत्रपति संभाजी महाराज ( श्री. वा. सी. बेंद्रे ) | .... | | | १६-०-० |

अनुक्रमणिका







# सार-सकलन

## विद्यापीठीय शिक्षण आणि बहुजन समाज — (१) रेडब्रिक विद्यापीठें

ऑक्सफर्ड व केंब्रिजसारखीं जुनीं विद्यापीठें सोडलीं तर ब्रिटनमधलीं बरीचशीं विद्यापीठें 'रेडब्रिक' (Redbrick) विद्यापीठें म्हणून ओळखलीं जातात. ब्रिटिश विद्यापीठीय जीवनांत 'ऑक्सब्रिज' (Oxbridge – Oxfort आणि Cambridge यामधून केलेला संयुक्तशब्द) आणि 'रेडब्रिक' हे दोन महत्त्वाचे प्रवाह आहेत. ऑक्सब्रिजचे विद्यार्थी अजूनहि बहुतकरून श्रीमंत वकील, डॉक्टर, इंजिनिअर, महाविद्यालयीन शिक्षक, सनदी नोकर, इत्यादि सांस्कृतिक दृष्ट्या पुढारलेल्या वर्गांतून येत आहेत. रेडब्रिकचे बहुसंख्य विद्यार्थी, कारकून, लहान व्यापारी, कामगार, प्राथमिक व दुय्यम शाळेंतील शिक्षक, अशा वर्गातून येत आहेत. घरचें वातावरण आणि भोंवतालची परिस्थिति यामुळें रेडब्रिक विद्यापीठांच्या विद्यार्थ्यांना ऑक्सब्रिजच्या विद्यार्थ्यांच्या मानानें कांहीं विशिष्ट अडचणींना तोंड द्यावें लागतें. इतकेंच नव्हे तर विद्यापीठीय जीवनांत उपलब्ध असलेल्या संधींचा स्वतःच्या विकासाकरितां पुरेपूर फायदा घेण्याची मनोवृत्तिहि त्यांच्यांत आढळत नाहीं. अशा परिस्थितींत विद्यापीठाच्या कार्यावर काय अनिष्ट परिणाम होतो त्याची चर्चा आस्ट्रेलियामधील एडिलेड विद्यापीठाचे भूतपूर्व कुलगुरु श्री. ए. पी. रो (A. P. Rowe) यांनी युनिव्हर्सिटीज क्वार्टर्ली या त्रैमासिकाच्या वर्ष १४, अंक ३ या अंकांत एका लेखांत केली आहे. आपल्या देशांतील बहुसंख्य विद्यापीठांचे प्रश्न कांहीं बाबतींत रेडब्रिक विद्यापीठाच्या प्रश्नासारखेच असल्यामुळें वर उल्लेख केलेल्या लेखांतून खालीं उद्धृत केलेला मजकूर वाचकांना उद्बोधक वाटेल.

" या विद्यापीठांत प्रवेश घेणारे बहुसंख्य विद्यार्थी अधिकाधिक प्रमाणांत अशा कुटुंबांतून येत आहेत कीं त्यांचा विद्यापीठीय जीवनांतून ज्या गोष्टी मिळूं शकतात त्यांच्याशीं संबंध नसतो. सामाजिक दृष्ट्या महत्त्व असलेलीं हीं सहस्रावधि तरुण-तरुणी दररोज आगगाडी, बस किंवा सायकलनें आपल्या घरून किंवा खोलीवरून विद्यापीठांत येतात, व्याख्यानें ऐकतात, प्रयोगशाळेंत काम करतात, कँटीनमध्यें जेवण घेतात आणि संध्याकाळच्या सुमारास आल्या वाटेनें परत जातात. हे लोक अल्पसंख्य असून पुस्तकप्रेमी बहुसंख्य विद्यार्थ्यांचा त्यांच्यावर हळुहळूं प्रभाव पडत असतो, अशीहि परिस्थिती आतां राहिली नाहीं. उलट हेच विद्यार्थी आतां बहुसंख्य असल्यामुळें ते एक स्वयंसंपूर्ण गट म्हणूनच असतात.

" विद्यार्थीवर्गाच्या स्वरूपांत हा फरक झाला असल्यामुळें या विद्यार्थ्यांना, उल्लेख करून दाखवितां न येणाऱ्या परंतु महत्त्वाच्या आणि पूर्वी सुशिक्षित कुटुंबांतून नकळत मिळणाऱ्या गोष्टी आतां विद्यापीठानें द्यावयास पाहिजेत, हें कोण नाकारूं शकेल ? अशा विद्यार्थ्यांकडे अधिक लक्ष पुरविण्याची आवश्यकता असते असेंच नव्हे तर एका अर्थानें तसा त्यांचा अधिकारहि आहे. कारण कीं कुटुंबाची अशी परंपराच असली तर विद्यापीठांत प्रवेश मिळविण्याचा प्रयत्न करणें यांत कौतुकास्पद असें कांहीं नाहीं. परंतु शाळेंत आपल्याबरोबर असलेले मित्र बाहेर नोकरीस लागून पैसे कमावीत असतांना, विशी उलटून गेल्यानंतरहि शिक्षण चालूं ठेवण्यास एक प्रकारची श्रद्धा आणि धैर्य लागतें.

" आतां विद्यापीठांतून बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्यांचा संख्यात्मक आणि गुणात्मक विचार करूं या. बहुसंख्य विद्यार्थी प्रथम पदवी मिळाल्यानंतर विद्यापीठ सोडून जातात. आधुनिक काळांतल्या समाजरचनेंत वेगवेगळे उद्योगधंदे, व्यापार, स्थानिक संस्था, सरकार इत्यादींच्या कारभारयंत्रणेंत नेहमींचें कार्य करण्यास हजारों पदवीधरांची गरज असते. प्रथम पदवीपरीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर विद्यापीठ सोडून जाणारे बहुसंख्य विद्यार्थी सर्वसाधारणपणें हुशार आणि स्वतःबद्दल



अनुक्रमणिका







भलत्या कल्पना न बाळगणारे असे असतात. आपल्या समाजाला दरवर्षी अशा अनेक पदवीधरांची आवश्यकता असते.

"पहिल्या दर्जाची बुद्धिमत्ता असलेल्या अल्पसंख्य पदवीधरांचा विचार सध्यां न करतां बहुसंख्य सर्वसाधारण पदवीधरांचा विचार केला तर एक प्रश्न उपस्थित होतो. या तरुणमंडळीना विद्यापीठाकडून काय मिळावयास हवें होतें ? या प्रश्नाला दिलीं जाणारीं अनेक उत्तरें पाहिलीं तर खालील गोष्टी सर्वसामान्यपणें आढळून येतात.

(अ) विद्यार्थी घेऊं इच्छिणाऱ्या उद्योगधंद्याच्या मूलतत्त्वाचें ज्ञान: असें ज्ञान त्याच्या धन्याला लागलीच उपयोगाचें नसलें तरी, त्याला जसजसा अनुभव येत जाईल आणि परिस्थिति व कार्यपद्धति यांत बदल होत जाईल तसतसें त्याचें महत्त्व दिसून येईल; अशा ज्ञानाबरोबर विद्यार्थ्यास आपल्या अभ्यासाच्या क्षेत्रांत विचार करण्यास आणि विचारांना स्पष्ट भाषेंत मांडण्यास आवश्यक असणाऱ्या शक्तींचा विकास केला जातो.

(ब) शिकण्याचा आनंद उपभोगण्याची इच्छा, आणि शिकणें म्हणजे खरोखर आनंद आहे याची जाणीव; स्वतःच्या विषयाव्यतिरिक्त परंतु आपल्या उद्योगधंद्याशीं संबंधित अशा इतर कांहीं विषयाचें थोडें ज्ञान. असें ज्ञान म्हणजे काम कंटाळवाणें होणार नाहीं याची हमी आहे.

(क) असे कांहीं मित्र कीं ज्यांच्या संगतींत चर्चा करतांना सूर्यच दमून क्षितिजाखालीं निघून जाईल ("friends with whom they have tired the Sun with talking and sent him down the sky").

"अनेक संस्था आणि खुद्द विद्यापीठें यांनीं विद्यार्थ्यांबद्दल प्रसिद्ध केलेल्या खंडीभर माहितींत विद्यापीठांस साजेशा पद्धतीनें विद्यार्थ्यांचें शिक्षण होत आहे का नाहीं, या संबंधीचें गुणात्मक मूल्यमापन मला कोठेंहि दिसलें नाहीं. एका आस्ट्रेलियन विद्यापीठांतल्या माझ्या कारकीर्दींत सतत पांच वर्षें मी असा एक सर्व्हे घेऊन विद्यार्थ्यांच्या एका पिढीची विद्यापीठप्रवेशापासून पदवी घेऊन बाहेर पडेपर्यंत पाहणी केली. ...त्यांत असें स्पष्ट दिसून आलें कीं विद्यार्थ्यांकरितां, विशेषतः उच्च शिक्षणाचे संस्कार न झालेल्या कुटुंबांतून येणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां, विद्यापीठ कांहीं करीत नव्हतें. विशाल पायावर आधारलेलें शिक्षण आवश्यक आहे, हें मान्य केलें तर अ-सुशिक्षित कुटुंबांतून येणाऱ्या मुलांना योग्य संधी मिळत नाहीं, हें या सर्व्हेतून पूर्णपणें स्पष्ट झालें. आपल्या अगोदर होऊन गेलेल्याना दोष देणें सोपें आहे, आणि याप्रमाणें शाळांना याबाबतींत दोष दिला जातो; परंतु माझें मत असें आहे कीं याची मुख्य जबाबदारी विद्यापीठांवर आहे.

"विशिष्ट पेशाकरितां रेडब्रिकच्या विद्यार्थ्यांना लागणारें शिक्षण फार महत्त्वाचें आहे आणि हें शिक्षण देणाऱ्यांस केवळ आर्थिकदृष्ट्याच नव्हे तर शिक्षणक्षेत्रांत मानाचें स्थान या स्वरुपांत मोठा मोबदला मिळावयास पाहिजे. तसेंच येथें एक दुसरा प्रश्न उपस्थित होत असतो. एकीकडे आपण निवडलेल्या पेशांत आवश्यक असलेल्या शिक्षणक्रमाबाहेरचें इतर कांहींहि शिकण्यास नाखूष असलेला सर्वसाधारण रेडब्रिक विद्यार्थी असतो. दुसऱ्या बाजूस आतां अधिकाधिक मालक लोक आणि प्रचलित प्रश्नांचें समालोचन करणारी मंडळी असें म्हणत आहेत कीं संकुचित तज्ञापेक्षां त्यांना विशाल शिक्षण घेतलेल्या पदवीधरांचीच जरूरी आहे.

"अ-सुशिक्षित कुटुंबांतून येणाऱ्या बहुसंख्य विद्यार्थ्यांकरितां धंदेवाईक शिक्षणक्रमाचें सक्तीचें विशालीकरण आवश्यक आहे. एक तर पेशांतील कार्याशीं वरपांगीं कांहीं संबंध नसलेल्या विषयांत परीक्षा ठेवून, किंवा धंदेवाईक शिक्षणक्रमांना केन्द्रस्थानीं ठेवून त्यांचा व्याप वाढविणें या दोन मार्गांनीं शिक्षणक्रमाचें विशालीकरण साध्य करतां येईल. उदाहरणार्थ, इंजिनिअरिंगच्या विद्यार्थ्यांला औद्योगिक आणि सामाजिक क्रान्तीचे परिणाम शिकवितां येतील. या दोन विकल्पापैकीं कोणता अधिक चांगला याबद्दल फार थोड्या माणसांना शंका वाटेल. धंदेवाईक शिक्षण घेणाऱ्या बहुसंख्य रेडब्रिक विद्यार्थ्यांना आपल्या शिक्षणक्रमाशी सकृत्‌दर्शनीं कांहीं संबंध नसणाऱ्या तत्त्वज्ञान आणि इतिहास यासारख्या विषयांवर सक्तीचीं व्याख्यानें लादणें म्हणजे त्यांच्या मनांत या विषयाबद्दल प्रेमाएवजीं तिरस्कार उत्पन्न करण्यासारखें होईल. परंतु हेच विषय जर त्यांच्या पुढील पेशाच्या शिक्षणक्रमास








मध्यभागीं ठेवून शिकविले जाऊं लागले तर त्याच्या विचारशक्तीला चेतना मिळेल, आणि आपला पेशा समकालीन समाजरचनेंत कसा बसतो याची त्यांना अधिक चांगली कल्पना येईल : त्यांचें शिक्षण आजच्या मानानें अधिक विशाल होईल. तथाकथित मानवी-प्रधान अभ्यासक्रमां (Humanities) बद्दलहि असेंच विधान करतां येईल. दुर्दैवानें हा तोडगा स्वीकारण्याच्या बाबतींत अनेक अडथळे आहेत. स्वतःच्या विषयाच्या भोवतालीं व्यापकरित्या शिक्षण देऊं शकणारे कांहीं विद्यापीठीय शिक्षक असतात, हें खरें आहे. परंतु शिक्षकभरतीची आजची पद्धत पाहतां असें शिक्षण न देऊं शकणाऱ्यांचीच संख्या अधिक भरेल हें उघड आहे. अनेक विद्यापीठीय शिक्षक एका संकुचित क्षेत्रांत त्यांनीं प्रसिद्ध केलेल्या कांहीं संशोधनात्मक लेखावरून निवडलेले असतात, त्यांचा शिक्षणानुभव किंवा शिक्षणचातुर्य यामुळें नव्हे. व्यापक शिक्षण देण्याच्या त्यांच्या कुवतीबद्दल तर क्वचितच विचारणा केली जात असेल.

" यांवर उपाय काय ? व्यापक शिक्षण देऊं शकणारे शिक्षक निर्माण करण्याकरितां त्यांच्या प्रशिक्षणाची सोय केली पाहिजे का ? या कल्पनेनें सुद्धां अनेकांना शिसारी येण्याचा संभव आहे, आणि तरीहि तसेंच करावें लागण्याचा संभव आहे. शिक्षकांच्या पातळीच्या पलीकडून सत्तेचा थोडा उपयोग केल्या शिवाय या दिशेनें कांहीं घडण्याचा संभव कमीच आहे. "

## ( २ ) भारतीय विद्यापीठें

**ट्वेन्टिएथ सेन्चरी** ( Twentieth Century ) या मासिकाच्या ऑगस्ट १९६० च्या अंकांत विद्यापीठाचे प्रश्न या विषयावर दोन लेख प्रसिद्ध झाले आहेत. त्यांतील **विलियम वॉल्श** यांच्या **भारतीय विद्यापीठें** या लेखांतून खालील मजकूर घेतला आहे.

" परस्परविरोधी तत्त्वांच्या विरोधाची तीव्रता हें भारतीय जीवनाचें एक वैशिष्ट्य आहे. आणि विद्यापीठेंहि त्याला अपवाद नाहींत. माझ्या मतें विद्यापीठें हीं आधुनिक जगांत सामाजिक चेतनेचीं मध्यवर्ती इन्द्रियें आहेत. हीं विद्यापीठें विशालतर समाजाची अभिव्यक्ति आणि घडण करण्यास तीं साहाय्य करीत असतात. तीं त्याच्या स्थितीची अचूक निर्देशक होत. संख्येच्या प्रवाहांत गुण वाहून जाणार नाहींत याची खबरदारी घेणें; ज्ञानाचा प्रसार करतांना ( तें निकस होऊन ) **कोलरीजनें** म्हटल्याप्रमाणें त्याचें जनतीकरण ( plebification ) होणार नाहीं अशी दक्षता बाळगणें; आणि संख्येच्या भाराखालीं शैक्षणिक दर्जाचा मानदंड मोडूं द्यायचा नाहीं. थोडक्यांत गुण आणि संख्या यांच्यामध्यें योग्य तो संबंध कसा प्रस्थापित करावयाचा हा आज विद्यापीठांचा महत्त्वाचा प्रश्न होय. आपल्याला वाटतें कीं आपण या प्रश्नाला तोंड द्यावयाचें आहे. परंतु भारतांत हा प्रश्न इतक्या भीषण प्रमाणांत आहे कीं आपण त्याची सहजासहज कल्पनासुद्धां करूं शकणार नाहीं.

भारतीय सरकार आपल्या राष्ट्राला शतकांच्या कुंभकर्णीय जाड्यांतून आधुनिक जगांत पुढें ढकलण्याचा धीरोदात्त प्रयत्न करीत आहे. शिक्षण म्हणजे आधुनिकीकरणाचें रहस्य होय. खरोखरच गेल्या १२ वर्षांत भारतानें शिक्षणाच्या क्षेत्रांत विस्मयजनक प्रगति केली आहे. १९४७–४८ या वर्षांत सहा ते अकरा वर्षें या वय गटांतली दीड कोटी मुलें शाळेंत जात होतीं; आज त्यांची संख्या तीन कोटी आहे. १९४७–४८ मध्यें माध्यमिक शाळेंत शिकणाऱ्या मुलांची संख्या तीस लाख होती; आज तीच संख्या ऐंशीं लाख आहे. १९४७–४८ मध्यें महाविद्यालयीन विद्यार्थ्यांची संख्या अडीच लक्ष होती; आज त्यांची संख्या दहा लक्ष आहे. महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या झालेल्या वाढीचें प्रमाण शाळकरी मुलांच्या प्रमाणापेक्षां स्पष्टपणें अधिक आहे; आणि भारताच्या चाळीस कोटी जनतेचा निम्माअधिक भाग निरक्षर आहे हें लक्षांत घेतलें तर महाविद्यालयीन विद्यार्थ्यांत झालेली ही वाढ असामान्य वाटते. भारतांत माध्यमिक शाळेंत असणाऱ्या प्रत्येक आठ मुलांपैकीं एक मुलगा विद्यापीठांत प्रवेश करतो, हें उघड आहे.

वस्तुतः परिस्थिति अशी आहे कीं भयंकर तकलादी आणि भयंकर अस्थिर अशा शालेय शिक्षण-व्यवस्थेच्या पायावर भारतांत एक विशाल विद्यापीठीय शिक्षणाची संघटना उभारली गेली आहे. अशा परिस्थितीत विद्यापीठाला माध्यमिक शाळेचें कार्य करणें भाग पडतें. भारतीय विद्यापीठांत प्रथम पदवीकरितां अभ्यास करणारे बहुसंख्य विद्यार्थी जें कार्य करीत आहेत तें युरोपीय मानदंडानें जवळ जवळ








शालेयशिक्षणाच्या दर्जाचें आहे. विद्यापीठांची प्रवेश-संख्या वाढविण्याकरितां जोराचें राजकीय, सामाजिक आणि आर्थिक दडपण एकसारखें चालूं असतें. किमान गुण असल्यास प्रत्येकाला विद्यापीठ प्रवेशाचा अधिकार असतो; आणि ज्याअर्थी पांच कोटी बेकार असलेल्या या देशांत साध्या कारकुनाचीहि नोकरी मिळविण्यास विद्यापीठीय पदवीची आवश्यकता असते, त्याअर्थी विद्यापीठांत प्रवेश मिळण्याची खरोखर योग्यता नसलेल्या लोकांची विद्यापीठांत गर्दी होत असते.

" भारतासारख्या फार थोड्या शाळा असलेल्या देशांत विद्यापीठांनीं शाळेचें कार्य न करण्याचें असें कांहीं निर्णायक कारण नाहीं. अमेरिकेंत खऱ्या अर्थानें विद्यापीठीय शिक्षण पदव्युत्तर टप्प्याला सुरूं होतें तशी एखादी व्यवस्था भारतात विकास पावण्याचा बराच संभव आहे. संख्येला अगोदर महत्त्व देऊन पुढल्या पायरीवर गुणाचें प्रामुख्य पुन्हां प्रस्थापित करणें या धोरणास अनिवार्य असा कोणताहि प्रत्यवाय नाहीं. परंतु अमेरिकन पद्धति स्वीकारण्यास मोठी लोकसंख्या हें पुरेसें कारण असलें तरी गुणांची जोपासना आपल्याला ( पश्चिम युरोप आणि इंग्लंडसारख्या देशांना ) शक्य आहे. त्यापेक्षां फार पुढें टाकण्यास लागणारें अर्थवैपुल्य भारताजवळ नाहीं. याशिवाय खास त्याच्या अशा कांहीं विशिष्ट अडचणीहि भारताला आहेतच.

" अशा अडचणीतली सर्व प्रथम म्हणजे भाषेचा गुंतागुंतीचा प्रश्न होय. राष्ट्र म्हणून व्यक्तिमत्त्व मिळाल्यावर भारतीयांनीं पुढचें पाऊल म्हणून राष्ट्रीय भाषा निर्माण करण्याची आकांक्षा बाळगणें स्वाभाविक आहे. परंतु भारतांत किमान १४ प्रादेशिक भाषा आहेत. तसेंच सरकार पुढें मागें जी भाषा शिक्षणाचें माध्यम व्हावी अशी इच्छा बाळगते, आणि जी सर्वांत अधिक मोठ्या विभागांत समजली जाते, ती हिंदी भाषा प्रगत बौद्धिक कार्यास पुरेशी विकसित झालेली असून शिक्षणाचें माध्यम होऊं शकेल, याबद्दल शंका आहे. आणि यावर विद्यापीठांत शिकविल्या जाणाऱ्या महत्त्वाच्या विषयांत पुरेशीं पाठ्य पुस्तकेंहि अस्तित्वांत नाहींत; म्हणून हिंदी जरी शिक्षणाचें माध्यम झाली तरी वाचन इंग्रजीतूनच करावें लागेल. तदुपरान्त अनेक भारतीयांना हिंदी ही इंग्रजी इतकी परकी भाषा वाटत नसली तरी इंग्रजीपेक्षां थोड्या लोकांना समजते, हें निश्चित आहे. या विचित्र परिस्थितीवर नीटनेटका तोडगा शोधून काढणें खरोखर अवघड आहे. कायद्यानें भाषा अस्तित्वांत आणतां येत नाहीं. कदाचित् प्रादेशिक भाषांचा विद्यापीठीय शिक्षणाचें माध्यम होण्यासारखा हळूहळूं विकास होत जाईल; कदाचित् राष्ट्रीय पातळीवर कारभाराची भाषा म्हणून हिंदीचा विकास होईल. दरम्यानच्या काळांत प्रगत अभ्यासासाठीं सर्वसाधारण माध्यम म्हणून इंग्रजी उपलब्ध राहील. भारत हा युरोपांत समजल्या जाणाऱ्या अर्थानें देश असण्यापेक्षां एक खंड आहे हें लक्षांत ठेवलें तर त्याच्या असामान्य वाटणाऱ्या भाषिक अडचणी इतक्या असामान्यहि वाटणार नाहींत. त्याचा प्रचंड आकार आणि त्याचें संस्कृति वैविध्य याकरितां द्यावी लागणारी ती एक किंमत आहे, असें समजण्यास हरकत नाहीं.

" परंतु आज जेथें इंग्रजी अजून शिक्षणाचें माध्यम आहे, तेथें इंग्रजीवर दिवसेंदिवस कमी प्रभुत्व असणारे विद्यार्थी विद्यापीठांत येत आहेत. भारतीय विद्यार्थ्यांना तोंड द्यावें लागणाऱ्या अडचणींत यामुळें भर पडते. या अडचणी म्हणजे अंधुकरित्या समजूं शकणाऱ्या भाषेंतून फार मोठ्या वर्गांत शिकणें, अवघड आणि अनेकदां असुसंस्कृत परिस्थिति, नोकरी मिळविण्याकरितां पदवीची नितांत आवश्यकता, विद्यार्थीविद्यार्थिनींच्यामध्यें सहज आणि अकृत्रिक संपर्काचा अभाव, इत्यादि होय. परिणामीं इतरांच्यापेक्षांहि भारतीय विद्यार्थी समजण्यापेक्षां घोकंपट्टी करण्याच्या प्रलोभनास फार सुलभतेनें बळी पडतात. त्यांच्या चारित्र्यांत खरोखरच फार विचित्र असे परस्पर विरोधी गुण आढळतात. एका बाजूनें गुरुशिष्य परंपरेचा वारसा म्हणून कीं काय परंतु हे विद्यार्थी अतिरेकी प्रमाणांत बौद्धिक दास्य आणि चिकित्सक वृत्तीचा अभाव दाखवितात; दुसऱ्या बाजूनें विद्यापीठानें थोडीशीहि वैध अधिकार वापरण्याची वृत्ति दाखविली कीं ते अतिशय स्वैर आणि बेशिस्त स्वभावाचें प्रदर्शन करतात. उदाहरणार्थ, परीक्षेच्या प्रश्नपत्रिका विद्यार्थ्यांना नापसंत पडल्यास तर अनेकदां संप पुकारले जातात– आणि हे संप अहिंसक असतात असें अजिबात नाहीं. ब्रिटिश










राज्यकर्त्यांविरुद्ध यशस्वीरित्या उपयोगांत आणलेला, विद्यापीठांत राजकीय चळवळ सुरू करण्याचा प्रघात अजून भारतीय विद्यापीठांचा एक शाप होऊन बसला आहे. विद्यार्थ्यांची बेशिस्त आतां राष्ट्रीय पातळीवर चिंता वाटणारा प्रश्न झाला आहे.

भारतीय विद्यापीठें परिस्थितीमुळें राजकीय दडपणास तोंड देण्यास असमर्थ झालीं आहेत. त्यांतील जवळ जवळ सर्वांना युनिव्हर्सिटी ग्रँट्स कमिशनकडून चालू ग्रँटचा एक अंशच मिळत असतो; आणि राज्यसरकारनें याला पूरक प्रमाणांत ग्रँट द्यावयाची असते. राज्यसरकारें मध्यवर्ती सरकारनें केलेल्या नियमांकडे प्रेमानें बघत नाहींत; तसेंच केंद्रीय मदत घेतल्यामुळें आपल्याला तसाच खर्च करावा लागणार असेल तर तशी मदत घेण्यास तीं नाखूष असतात. यावरून हें सहज लक्षांत येईल कीं विद्यापीठांचें धोरण, कारभार आणि स्वायत्तता यांच्यावर (अनिष्ट) प्रभाव पाडण्याच्या अनेक संधी स्थानिक राजकीय पुढाऱ्यांना या पद्धतीमुळें उपलब्ध होतात. आणि अशा संधींचा फायदा घेण्यांत इतरांपेक्षां भारतीय राजकीय पुढारी कमी उत्सुक असतात असें समजण्याचें कारण नाहीं.

हें सगळें सांगून झाल्यावर भारतीय विद्यापीठीय शिक्षकाबद्दल मला वाटणारें कौतुक व्यक्त करणें भाग आहे. अपुरा पगार, वरून अरेरावीची वागणूक नव्हे तर शोषणसुद्धां, नेहमीं अवघड आणि अनेकदां काम अशक्य करून टाकणारी परिस्थिति, या सर्व अडचणींना तोंड देत देत, भारताच्या लोकशाही कायापालटाच्या चित्तथरारक प्रक्रियेस पुढें नेण्यास ते इतर कोणत्याहि गटाइतकें साहाय्य करीत आहेत. सरकार आणि टाटा करतात तितकेंच, तेहि भारताला त्याच्या परंपरागत अध्यात्माच्या सुस्तीतून जागा करण्याचें कार्य करीत आहेत.

## क्रुश्चेवच्या सत्तेचें स्वरूप

गेल्या मे महिन्यांत पॅरिस येथें होणारी शिखर परिषद फिसकटल्यानंतर क्रेमलीनमध्यें खरी सत्ता कोणाच्या हातांत आहे, याबद्दल झाले तितके तर्कवितर्क गेल्या कांहीं वर्षांत कधीं झाले नव्हते. वार्ताहर आणि समीक्षक म्हणूं लागले कीं सोव्हियेत कम्युनिस्ट पक्षाच्या प्रेसिडिअममध्यें क्रुश्चेवविरोधी डावा गट तयार झाला आहे आणि या गटाच्या आणि चीनच्या दडपणामुळें क्रुश्चेवनें शिखर परिषद सुरू होण्यापूर्वींच उधळून लावली ( पहा : सारसंकलन, नवभारत, सप्टेंबर १९६० ). परस्परविरोधी पुरावे, तथ्य आणि वदंता, आणि सर्वांत अधिक महत्त्वाचें म्हणजे सोव्हियेट रशियांत प्रचलित असलेल्या सत्तेच्या नियमांचें आपल्यास असलेलें ज्ञान – या पार्श्वभूमींत क्रुश्चेवच्या सत्तेचें खरें स्वरुप काय आहे, असा प्रश्न अनेक राजकीय विचारवंतांना पडत असला तर त्यांत नवल नाहीं. या विषयावर श्री. रिचर्ड लोवेन्थाल यांनीं 'साम्यवादाचे प्रश्न' ( Problems of Communism ) या द्वैमासिकाच्या जुलै–ऑगस्ट, १९६० या अंकांत लिहिलेल्या लेखांतून खालील उतारा दिला आहे.

"शिखरपरिषद उधळून लावण्यांत क्रुश्चेवचा काय हेतु होता, आणि त्याचे परिणाम काय झाले किंवा होतील – हें तपासण्याचा हा लेखाचा उद्देश नसून, त्याच्या सत्तेचें स्वरुप आणि तिला असलेल्या मर्यादा यांचा विचार करणें हा होय. या संदर्भांत एक महत्त्वाचा प्रश्न असा आहे कीं, एकपक्षीय राज्यव्यवस्थेंत हुकूमशाहा कोणत्या अर्थानें आवश्यक असतो ? साम्यवादाच्या अधिकृत सिद्धांतांत अशी आवश्यकता कधीं मानली गेलेली नाहीं; अधिकृत सूत्रानुसार पक्षाची हुकूमशाही 'लोकशाही केंद्रीयत्वा ( democratic centralism ) वर उभारलेली असते. लोकशाही केंद्रीयत्व म्हणजे असें कीं लोकशाही पद्धतीनें पक्षपरिषदा आणि पक्षाच्या मध्यवर्ती कमिटया चर्चेनंतर पक्षधोरणावर निर्णय घेतात आणि नंतर केंद्रीय नियंत्रणाखालीं त्याची शिस्तबद्ध आणि एकमुखी अंमलबजावणी होत असते. आपल्या कारकीर्दीच्या उत्तरार्धांत स्टालिन या काल्पनिक सूत्राला तिलांजली देऊन उघड उघड हुकूमशहा म्हणून राज्य करीत होता. परंतु स्टालिनच्या दोषाचा धिक्कार करतांना क्रुश्चेवनें लोकशाही केंद्रीयत्वाच्या लेनिनवादी सिद्धांताचें पुनर्जीवन करण्याचें आश्वासन दिलें होतें. आणि त्या आश्वासनानुसार त्यानें केंद्रीय कमिटीच्या सभा नियमितपणें बोलाविल्या आहेत. त्याचें असेंहि म्हणणें आहे कीं या कमिटीच्या सभांच्या दरम्यानच्या काळांत प्रेसिडियमनें घेतलेले निर्णय बहुमतावर आधारलेले आहेत.








परंतु या पद्धतीमुळें पक्षाच्या प्रमुख कमिटयामध्यें मोकळी चर्चा आणि धोका न पत्करतां तात्कालिक मतभेद दाखविणें शक्य झालें असलें, तरी त्याचा अर्थ असा नव्हे कीं पक्षांतर्गत संघटित विरोधी गटावर लेनिननें १९२१ मध्यें घातलेली बंदी सैल केली आहे. या बंदीनुसार पक्षाच्या प्रमुख कमिटीमधले अल्पमतांत असलेले सभासद आपले मतभेदांना खालच्या विशालतर कमिटीपुढें आणि गरज वाटल्यास शेवटीं पक्षाच्या साधारण सभेपुढें वाचा फोडूं शकत नाहींत. असा प्रयत्न केला कीं त्या गटानें 'गटबाजी'चा म्हणजे पक्षाविरुद्ध कारवाया करण्याचा गुन्हा केला असें आपोआप ठरतें. याचा अर्थ असा झाला कीं धोरणाच्या बाबतींत सर्व उपक्रमशीलता पक्षांत उच्चतम स्थानीं केंद्रित केलेली असते. केंद्रीय कमिटीपुढें प्रेसिडियमचे निर्णय, आणि पक्षाच्या साधारणसभेपुढें केंद्रीय कमिटीचे निर्णय मान्यतेसाठीं ठेवले जातात.

एकपक्षीय कारभारास इतर कोणतीहि पद्धत घातक ठरेल; कारण कीं एकदा अशा पक्षांत वेगवेगळे मतप्रवाह संघटित होऊं दिले कीं वस्तुतः ती राज्यव्यवस्था दुसऱ्या नांवाखालीं बहुपक्षीय बनते. परंतु समाज ज्यांत आपोआप बसणार नाही त्याला एका विशिष्ट चौकटींत बसवावयाचें झाल्यास, सर्व सत्ता आणि उपक्रमशीलता एके ठिकाणीं केंद्रित करण्याचा आग्रह धरणें कोणत्याहि पक्षाला भाग पडतें.

राजसत्तेच्या वारसाकरितां निर्माण झालेल्या आणीबाणीच्या परिस्थिती सोडल्या तर सोव्हिएट अनुभव या सिद्धांताशीं जुळणारा आहे. मतभेद उच्चपदस्थाच्या पातळीवरून खालीं प्रसार पावणार नाहींत. या करितां लागणारी सामूहिक शिस्त एका सर्वमान्य नेत्याच्या राजकीय आणि नैतिक सत्तेवर अवलंबून असते. परंतु असा नेता समोर नसला तर धोरणाबाबतीचा प्रत्येक मतभेद पक्षांत महत्त्वाच्या जागाकरितां चालू असलेल्या सत्तास्पर्धेत रूपांतर पावतात, आणि हुकूमशाही सत्तेकरितां भांडत असलेले स्पर्धक खेळाचे नियम पाळीत नाहीत. म्हणून १९२३ पासून स्टालिन सर्वसत्ताधीश होईपर्यंतच्या काळांत, आणि तसेंच स्टालिनच्या मृत्यूनंतर क्रुश्चेवनें सर्वमान्य नेता म्हणून स्वतःच्या आसनावर स्थिर होईपर्यंत रशियांत गटबाजीला ऊत आला होता.

लेनिन आणि स्टालिन या दोघांच्या नंतर सत्तेकरितां निर्माण झालेल्या झगड्यांत पक्षाचा सरचिटणीस—म्हणजे एकपक्षीय राज्यव्यवस्थेत कायदेशीर सत्तेचें मूर्तस्वरूप असणारी कार्यकारी यंत्रणा असते तिचा प्रमुख—विजयी झाला आहे. या दोन्ही विजयाचें कारण उघड आहे : चिटणीसमंडळाचा प्रमुख म्हणून क्रुश्चेवला आदराचें स्थान होतेंच; परंतु त्याचबरोबर प्रेसिडियमच्या सभाकरितां कार्यपत्रिका तयार करणें आणि सभासदांना माहिती पुरविणें, त्याच्या धोरणाची अंमलबजावणी करणें, आणि सर्वांत अधिक महत्त्वाचें म्हणजे नेमणुका आणि प्रकाशन व जाहिरात— या सर्व गोष्टी चिटणीसमंडळाच्या हातांत असतात. चिटणीस मंडळ एक कार्यकारीमंडळ असल्यामुळें त्यांत मतें घेतलीं जात नाहींत; तेथें केवळ श्रमविभाजन आणि आज्ञापालन असतें. जो कोणी या मंडळांत अधिकार गाजवूं शकतो, तो प्रेस आणि राडिओवरील आपल्या सत्तेचा उपयोग करून पक्षांतर्गत कोठल्याहि सत्ताकलहाचा परिणाम ठरवूं शकतो; विभागीय घटक प्रजासत्ताकांच्या पक्षचिटणीसांची नेमणूक करूं शकतो; आणि पुढील साधारण सभा आपल्या बाजूच्या लोकांनीं भरून पुढील केंद्रीय कमिटी आपल्या इच्छेनुसार घडवूं शकतो. एकदां सत्तेच्या झगड्यांत विजयी झाल्यानंतर वर उल्लेख केलेल्या गोष्टींचा उपयोग करून तो नवीन सर्वमान्य नेता म्हणून पुढें येतो, आणि मग तर त्याची सत्ता अधिकच स्थिर आणि व्यापक बनते.

क्रुश्चेवच्या बाबतींत असेंच घडलें आहे. एका दृष्टीनें तो अधिक सावध राहिला आहे. तो रशियामधून अनेकदां गैरहजर असतो, परंतु आपले विविध सत्ताप्रकार तो कुठल्याहि एका अनुयायाच्या हातीं देत नाहीं. तसेंच त्यानें निर्माण केलेली पार्टीब्यूरो केंद्रिय कमिटिपासून अधिकाधिक दूर ठेवली आहे. ...... या सर्व बदलाचा परिणाम असा झाला कीं प्रेसिडियमवरच्या बहुसंख्य ( १५ पैकीं ११ ) जागा आतां चिटणीस मंडळाच्या सभासदांनीं भरलेल्या नसून तेथें आतां क्रुश्चेव्ह आणि त्याच्या हाताखालचीं तीन वेगवेगळया गटाची माणसें आहेत.

क्रुश्चेवनें ज्या पद्धतीनें आपली सत्ता अविरतपणें संघटित केली आहे, तिच्याशीं त्याच्या नेतृत्वाला नवस्टालिनवादी किंवा चीनच्या धोरणास अनुकूल










अनुक्रमणिका

असलेला, नेता असलेला कोठलाहि गट आतां आव्हान देऊं शकेल ही कल्पना विसंगत दिसत आहे. अशा गटाला आतां १९५७ मधील पक्षविरोधी गटापेक्षा अधिक प्रतिकूल परिस्थितीपासून सुरुवात करावी लागेल – आणि तेंहि कोणत्याहि सत्तायंत्रणा- (power machine) वर काबू नसतांना, कोणत्याहि अखिल-देशीय नेत्याची कीर्ति नसतांना. आणि 'क्रुश्चेव पंथा'च्या वाढत गेलेल्या जोराला विरोध करून अशा गटाचा जन्म होईल आणि त्याची शक्ति वाढत जाऊन तो बहुमत मिळवूं शकेल, अशी कल्पना करणें म्हणजे सत्तेच्या वारसाकरितां चालूं असलेला अनिर्णित झगडा आणि एकपक्षीय राज्यांत सामान्य नियम म्हणून आढळणारी एकव्यक्तीय नेतृत्वाची परिस्थिती, यांची गल्लत करण्यासारखें होय.

आणि तरीहि याचा अर्थ असा नव्हे कीं क्रुश्चेव-च्या सत्तेला कोणत्याहि प्रकारच्या मर्यादा नाहींत. पदच्युत होण्याचा किंवा प्रेसिडियमच्या बहुसंख्य सभासदांच्या गटाच्या पंखाखालीं जावें लागण्याचा धोका क्रुश्चेवला आतां राहिला नसला तरी, सामाजिक शक्ती आणि समाजाच्या ज्या थराच्या आधारावर त्याची सत्ता उभारली गेली आहे त्यांच्यात असणारे मतप्रवाह यांच्याकडे तो दुर्लक्ष करूं शकत नाहीं. जनतेंत मोठयाप्रमाणांवर भीतीचें वातावरण निर्माण करणें, गुलाम-कामगारांचे कॅम्प उभारणें, इत्यादि गोष्टींना स्टालिननें त्यांचा प्रथम अवलंब केला त्यावेळेस देतां आलें असतें इतकेंहि समर्थन रशियाच्या आजच्या आर्थिक (विकासित) परिस्थितींत देतां येणार नाहीं. हें सत्य क्रुश्चेव जाणून आहे. परतु ज्या राज्य-कर्त्यांना भीति आणि पाशवी शक्तींचा अनियंत्रित उपयोग करून आपलीं उद्दिष्टें गांठावयाचीं नसतात, त्यांना ज्या सामाजिक शक्तींचा सहकार घ्यावा लागतो त्यांच्या इच्छा आकांक्षाचाहि विचार करणें आवश्यक असतें. याकरितां राज्यकर्त्यांवर प्रत्यक्ष राजकीय दडपण आणावें लागतें असें नाहीं. बहुसंस्थात्मक (लोकशाही) समाजांत वेगवेगळया सामाजिक गटांकडून सरकारवर आणल्या जाणाऱ्या संघटित दडपणापेक्षा हें दडपण वेगळया प्रकारचें असतें, आणि म्हणून त्याचे परिणामहि वेगळया स्वरूपाचे असतात. उदाहरणार्थ, राज्यकर्त्यांच्या नियंत्रणाखालीं असलेल्या कामगारांना उत्पादनवाढीस प्रोत्साहन म्हणून मिळूं शकेल त्यापेक्षां स्वतंत्र ट्रेडयुनियनच्या स्वरूपांत संघटित असलेला कामगार वर्ग केव्हांहि अधिक वेतन आणि वेतनवाढ मिळवूं शकेल. सोव्हिएट रशियांत नजीकच्या भूतकाळांत घडलेल्या घटना अशा प्रकारचें अप्रत्यक्ष दडपण सुचवितात, प्रत्यक्ष आणि संघटित दडपण नव्हे.

परंतु क्रुश्चेवच्या सत्तेवर इतर अधिक प्रत्यक्ष स्वरूपाच्या मर्यादा असण्याचा संभव आहे. खुद्द लेनिनहि केंद्रीय कमिटींत अल्पमतांत सांपडत असे आणि त्याला तात्पुरता बहुमतास मान द्यावा लागत असे. वरिष्ठ पातळीवर मोकळी चर्चा पुनः सुरूं करून क्रुश्चेवलाहि आतां कधीं, कधीं किमान तपशीलाच्या बाबतींत, अल्पमतांत पडण्याची तयारी ठेवली पाहिजे. कारण कीं क्रुश्चेवचें विभूतिपूजेचें स्तोम लेनिननें कधींहि मान्य केलें असतें त्यापेक्षां मोठया प्रमाणावर सुरूं केलें असलें तरी लेनिन किंवा स्टालिनच्या सत्तेला सहज अधिकाराचें स्वरूप आलें होतें, तसें अजून क्रुश्चेवच्या बाबतींत झालें नाहीं. क्रुश्चेव सत्तेचीं सर्व सूत्रें आपल्या इच्छेनुसार हलवीत असतो; परंतु पक्षाच्या आंतल्या वर्तुळांत तो अजून ज्याच्या हातून चूक होणें अशक्य आहे असा सर्वज्ञ समजला जात नाही.

रशियन राज्यसत्तेच्या विकासाचा आजचा टप्पा नीट समजावून घेण्यास वर केलेलें प्रत्यक्ष राजकीय दडपण आणि अप्रत्यक्षरित्या पडणारा परिस्थितीचा प्रभाव यांमधला फरक जितका महत्त्वाचा आहे, तितकाच यांत्रिक अर्थानें सत्ता (mechanical power) आणि नैतिक अधिकार (moral authority) यांमधला फरक महत्त्वाचा आहे. ऐतिहासिक कामगिरीचा अभाव हें क्रुश्चेवच्या आजच्या परिस्थितीचें एक अंग आहे; म्हणून तो एकतर आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत डोळे दिपून जातील असें कांहीं-तरी करून दाखविण्याची धडपड करीत असतो, किंवा स्वदेशीं शेखमहमदी अभिवचनें देत बसत असतो. पाश्चात्यांना पश्चिम बर्लिन मधून हाकलून लावण्यासारखें एखादें आश्वासन पुरें करण्यास असमर्थ ठरल्यावर (स्टालिन करीत होता तसें) तो तें विस्मृति-








गुहेंत ढकलून देऊं शकत नाही, किंवा टीकाकारांचा नायनाट करून टीका बंद करवूं शकत नाही. म्हणून मागच्या निष्फळ ठरलेल्या उपक्रमांपासून लोकांचें लक्ष इतरत्र वेधण्याकरितां त्याला नवे नवें तितकेच चित्त-वेधक प्रकार सुरू करावे लागतात.

परंतु क्रुश्चोव्हच्या सत्तेला आव्हान दिलें जाण्याचा संभव आहे असें दाखविण्यास अजिबात पुरावा नाहीं. गेल्या कांहीं वर्षांचा इतिहास असें दाखवितो कीं बदलत्या परिस्थितीशीं लवकर जुळतें घेऊन क्रुश्चोव्ह आपली सत्ता आणि लोकप्रियता अविरतपणें संघटित करीत आला आहे, त्याच्या सत्तेचें स्वरूप अनिश्चित आहे असें नाहीं. या दोन गोष्टींची गल्लत करणें योग्य होणार नाहीं.

## राष्ट्रीयीकरणाचा उपयोग केव्हां होतो ?

ब्रिटिश समाजवादी चळवळींत गेलीं कांहीं वर्षें समाजवादाच्या वैचारिक अधिष्ठानाची मूलगामी चर्चा चालूं आहे. गेल्या तीस वर्षांत, विशेषतः दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळांत, असें दिसून आलें कीं, व्यक्तिस्वातंत्र्यावर घाला न घालतां शांततामय आणि वैधमार्गानें भांडवलशाहींत समता आणि सामाजिक न्यायाच्या दृष्टीनें इष्ट बदल शक्य आहे. तसेंच वाढत्या सुबत्तेबरोबर खुद्द कामगारांचें समाजवादी मूल्याबद्दलचें औदासिन्य वाढूं लागत असण्याचा प्रत्यय येऊं लागला आहे. आणि आधुनिक तंत्रविद्येमुळें उत्पादन वाढवून पन्नास वर्षांपूर्वीच्या भांडवलशाहीचीं इतर अनिष्टें राष्ट्रीयीकरणाचा अवलंब न करतां दूर करतां येतात, हेंहि स्पष्ट झालें आहे. इतकेंच नव्हें तर राष्ट्रीयकरणामुळें कार्यक्षमता कमी होते, आणि समाजाच्या आर्थिक जीवनांत नोकरशाहीची सत्ता वाढून त्याचा जिवंतपणा धोक्यांत येतो असा अनुभव आला आहे. म्हणून खाजगी हितसंबंधांचें वर्चस्व नाहींसें करण्यास राष्ट्रीयीकरण एकच मार्ग आहे कां, या प्रश्नाला समाजवादी विचारवंतांत चालू असलेल्या चर्चेंत फार महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें आहे. '**सोशलिस्ट युनियन**' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या, ब्रिटिश मजूरपक्षाच्या एका अंतर्गत गटातर्फे प्रसिद्ध झालेल्या '**विसाव्या शतकाचा समाजवाद**' ( Twentieth Century Socialism ) या पुस्तकावरून या चर्चेच्या स्वरूपाची कल्पना येईल. श्री. रिचर्ड क्रासमन् हे मजूरपक्षीय बुद्धिवंत या चर्चेत प्रामुख्यानें भाग घेणारे पुढारी आहेत. त्यांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या '**समृद्ध समाजांतील कामगार**' ( Labour in the Affluent Society ) या पुस्तिकेच्या '**सोशलिस्ट कमेन्टरी**' ( Socialist Commentary ) या मासिकांत श्री. ऑस्टेन आल्बू यांनीं केलेल्या समीक्षणांतून खालील उतारा घेतला आहे.

" राष्ट्रीयीकरणाचा वाद म्हणजे केवळ श्रद्धेवर आधारलेलीं विरोधक व समर्थक यांचीं आग्रही विधानें असें झालें आहे ही दुर्दैवाची गोष्ट होय. खरी आवश्यकता, राष्ट्रीयीकरण समाजवादी ध्येयपूर्तीसाठीं इतर कोणत्याहि मार्गापेक्षां अधिक चांगलें केव्हां असतें आणि राष्ट्रीयीकरणापेक्षां कमी विरोध जागृत करणारे परंतु तेवढेच फलदायी दुसरे मार्ग या ध्येयसाधनासाठीं केव्हां अवलंबिले पाहिजेत, याचा निर्णय घेण्यासाठीं निकष ठरविण्याचा आहे. सरकारी हस्तक्षेपाचे राष्ट्रीयीकरणाहून वेगळे मार्ग सुचविणें म्हणजे एक हलक्या प्रतीचा राजकीय संधिसाधूपणा होय असें म्हणणें अर्थहीन आहे.

" दोन कारणास्तव राष्ट्रीयीकरण आवश्यक असूं शकतें. एक कारण भांडवल गुंतवणुकीस आणि समाजहितावर खर्च करण्यास लागणारे पुरेसे राष्ट्रीय आय सरकारकडे नवीन कर न लादतां जमावयास पाहिजे आहे, हें असूं शकतें. परंतु खरोखरच आपण कर-मर्यादा गांठली आहे कां ? भांडवली नफ्यावर कर आणि अधिक मोठ्या प्रमाणावर मृत्युकर —— दोन्हीं शेअरच्या स्वरूपांत घ्यावयाच्या या दोन करापासून सरकारला विशेषतः भांडवल गुंतवणुकीसाठीं, पुरेसें उत्पन्न मिळून राहील.

" राष्ट्रीयीकरणाची आवश्यकता निर्माण करणारें दुसरें कारण भांडवल गुंतवणुकीची दिशा ठरविण्याची सरकारला गरज असणें, म्हणजेच सामाजिक बदलाकरितां नियोजन करणें, हें होय. निर्यातीवर अवलंबून असलेल्या आपल्या गुंतागुंतीच्या अर्थरचनेंत नियोजन आणणें तांत्रिक दृष्ट्या फार अवघड आहेच; परंतु त्याचबरोबर सामयिक मालकीनें न सुटणाऱ्या कांहीं महत्त्वाच्या सामाजिक आणि मनोवृत्तीय अडचणींहि आहेत. आपल्या स्वदेशी आणि विदेशी बाजारपेठांच्या स्थितीचा संपूर्ण होरा वर्तविला तर



अनुक्रमणिका







बदल आणि साधनसामुग्रीचें केंद्रीकरण या दोन्हींची आवश्यकता दिसून येईल. परंतु कलाईड वरचें अकार्यक्षम जहाजकारखाने किंवा कोवेन्ट्रीचे मोटार कारखाने बंद करून टाकण्यांत निर्माण होणारे मानवी प्रश्न सोडविणें राष्ट्रीयीकरणामुळें सोपें होईल का? कोळसाखाणींच्या राष्ट्रीयीकरणामुळें इतर फायदे झाले असतील, परंतु त्यामुळें कोलधोर्डे धंदा म्हणून यशस्वी झालें आहे हें सिद्ध होऊं शकलें नाहीं. आणि आपल्या आर्थिक जीवनांत असह्य प्रमाणावर जडता ओढवून घेण्याचा धोका पतकरल्याशिवाय जास्तीं उद्योगधंद्यांत राष्ट्रीयीकरणाचा स्वीकार करणें शक्य होणार नाहीं. हा प्रश्न सरकारी किंवा खाजगी उद्योगधंद्यांत वैयक्तिक कृतीनें सुटण्यासारखा नाहीं; त्याकरितां सरकारी पातळीवर कृतीची आवश्यकता आहे. लोकांना क्षीण होऊं लागलेल्या उद्योगांमधून विकासशील उद्योगांकडे नेण्यासाठीं, आणि ज्या विभागांत जुने उद्योगधंदे बंद पडत असतील तेथें नवीन उद्योगधंदे सुरूं करण्यासाठीं नवीन धोरणाची आवश्यकता आहे. केवळ राष्ट्रीयीकरणामुळें मात्र परिवर्तनास विरोध होईल."

## ईश्वराच्या अनुभवाचें रसायनशास्त्र

खालील उतारा दी ह्युमॅनिस्ट या मासिकाच्या ऑगस्ट १९६० च्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या श्री. मायकेल ब्रिग्ज (Michael Briggs) यांच्या The Chemistry of Religious experience या लेखांतून घेतला आहे.

"ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करूं पाहणारे तर्क चक्रनेमिक्रमानें लोकप्रिय होत असतात. एका पिढीस पटणारीं ईश्वरविद्येचीं मूलतत्त्वें नंतरच्या पिढीस हास्यास्पद वाटतात. उदाहरणार्थ, दृश्य सृष्टींत दिसून येणारे योजनाबद्धतेवर आधारलेले तर्क एकेकाळीं ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करण्यास समर्पक वाटत होते. आधुनिक ईश्वरवादी या तर्कांना बालसुलभ समजतात. ईश्वराचें अस्तित्व तर्कानें सिद्ध करतां येण्यासारखें आहे असें ते मानत असले तर ते एवढेंच म्हणतात कीं वैयक्तिक पातळीवर येणाऱ्या ईश्वराच्या प्रत्ययानेंच त्याचें अस्तित्व सिद्ध होतें. कांहीं व्यक्तींना असे अनुभव येतात हें नाकारणें अवघड आहे. परंतु महत्त्वाचा प्रश्न आहे तो असे अनुभव येतात कीं नाहीं हा नसून त्यामुळें ईश्वराचें अस्तित्व सिद्ध होतें का, हा आहे. आणि तसें नसेल तर मग हे अनुभव म्हणजे आहे तरी काय?

"या दोन प्रश्नांपैकीं पहिला तात्त्विक स्वरूपाचा आणि दुसरा शास्त्रीय स्वरूपाचा आहे. परंतु ते एक दुसऱ्याशीं असंबद्ध नाहींत, कारण कीं आपण स्वीकारलेल्या व्याख्यावर बरेंचसें अवलंबून असतें. उदाहरणार्थ, ईश्वरी अनुभवाचें कारण, मग तें कांहीं असो, म्हणजेच 'ईश्वर' असें ठरविलें तर त्यांत हरकत घेण्यासारखें कांहींच नाहीं. परंतु हें कारण म्हणजे तत्त्वतः अनिरीक्षणीय असें एक अतिमानवी 'सत्' तत्त्व आहे. असें जर कोणी म्हणत असेल तर तें भौतिक कारण दाखवून आपण खोटें ठरवूं शकूं असें एक अभ्युपगम होय. ईश्वरी अनुभवाचें भौतिक कारण शोधून काढतां आलें तर अशा अनुभवाची शक्यता ईश्वराचें अस्तित्व तर्कानें सिद्ध करण्याकरितां वापरली जाऊं शकणार नाहीं. मग गूढवाद्याचा ईश्वर म्हणजे त्याला जें अनुभवास येतें तें, एवढाच अर्थ होईल; परंतु असा ईश्वर म्हणजे आत्मनिष्ठ वैयक्तिक स्थिति (Subjective personal state) होय, विज्ञानास अभिप्रेत असलेल्या प्रकृतीच्या पलीकडचें वस्तुनिष्ठ (objective) अस्तित्व नव्हे.

"गेल्या कांहीं वर्षांत बायोकेमिस्ट्रींत झालेल्या शोधामुळें मानसिक अनुभव आणि मेंदूची स्थिति यांच्या परस्पर संबंधावर फार मोठा प्रकाश पडला आहे. यांत सर्वांत अधिक कुतूहल निर्माण करणारा शोध, दुभंगलेलें व्यक्तिमत्त्व (schizophrenia) आणि गूढवादी अनुभव यांच्याशी संलग्न असलेल्या मनःस्थिति कृत्रिमरित्या निर्माण करण्याच्या शक्यतेविषयींचा आहे. सामान्य माणसाला इंजेक्शन देऊन त्याला दुभंगलेल्या व्यक्तिमत्त्वासारखा अनुभव येईल असे पदार्थ प्रयोगशाळेंत निर्माण करणें शक्य झालें आहे. अशा पदार्थांना 'सायकोटॉमिमेटिक' औषधें (psychotomimetic drugs) म्हणून संबोधतात.

"अशा एखाद्या औषधाचें इंजेक्शन फार गंमतीदार परिणाम उत्पन्न करतें. सुरवातीस प्रयोगविषय (Subject of experiment) व्यक्तीस आपल्या शरीराचें वजन नाहिसें झालें आहे अशी हलकेपणाची भावना येते. यांतून लवकरच स्वतःच्या शरीराच्या आकारात बदल झाल्याची भावना निर्माण होते, स्वतःचें







शरीर भोंवतालच्या पदार्थांच्या मानांनं अगदीं लहान किंवा अगदीं प्रचंड झालें आहे असें वाटतें; पुढल्या पायरींत त्याला आपण आपलें शरीर सोडून बाहेर आलों आहोंत आणि त्याच्याकडे बाहेरून पाहात आहोंत, असं वाटतें. प्रयोगविषयाचें भोंवतालच्या पदार्थांचें दर्शन ( Perception ) अतिशय बदलतें दृष्टि, श्रवण आणि स्पर्श, या सर्वांवर परिणाम होतो. हीं औषधें असे परिणाम कोणत्या प्रक्रियेनें घडवून आणतात आणि दुभंगलेलें व्यक्तिमत्त्व आणि गूढवाद्यांचे ईश्वरी अनुभव यांच्याशीं संलग्न असलेली प्रक्रिया त्या प्रक्रियेसारखीच असण्याचा संभव आहे का ? या प्रश्नाचें उत्तर देणें अवघड आहे.

" सायकोटॉमिमेटिक औषधासारखे पदार्थ दुभंगलेल्या व्यक्तिमत्त्वाचा बळी आपल्या शरीरांत लहान प्रमाणांत उत्पन्न करीत असला पाहिजे, अशी एक सूचना पुढें आली आहे. या सूचनेंत कितपत तथ्य आहे हें पाहण्याकरितां अशा व्यक्तीच्या रक्ताची तपासणी करण्यांत आली आहे. अशा रक्तांतून टरेक्सिन (taraxin) म्हणून ओळखला जाणारा पदार्थ वेगळा पाडतां येतो. या पदार्थाचें सामान्य माणसाला इंजेक्शन दिलें तर त्याचा परिणाम सायकोटॉमिमेटिक औषधासारखा होतो. या पदार्थाबद्दल अजून जास्त माहिती उपलब्ध नाहीं, परंतु तो मनुष्याच्या मज्जातंतूंत सामान्यतः आढळणाऱ्या पदार्थासारखा असण्याचा संभव आहे.

" असामान्य मानसिक अनुभवांच्या भौतिक कारणांचा शोध अखेर यशस्वी होण्याच्या मार्गावर आहे, असें आतां स्पष्ट दिसत आहे. अशा प्रकारांचें कारण भौतिकच आहे याबद्दल आतां शंकेस स्थान राहूं शकत नाहीं. ईश्वरी अनुभवाबद्दल निश्चित निर्णयास येण्याकरितां अजून अधिक प्रायोगिक कार्याची गरज आहे. परंतु आपलें आजचें ज्ञान असें सुचवितें कीं एखाद्या व्यक्तीस असा अनुभव आला तर त्याचें कारण मेंदूवर सायकोटॉमिमेटिकसारखा एखादा पदार्थ असर करीत आहे, हें होय. तो कुठल्यातरी अतिप्राकृतिक (Supernatural) शक्तींच्या संपर्कांत आहे म्हणून नव्हे."

---





अनुक्रमणिका

प्रा. गोवर्धन पारीख

# लोकशाही विकेंद्रीकरणाची समस्या : १ :

लोकशाही विकेंद्रीकरणाच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं महाराष्ट्र राज्यानें एक समिती नेमली आहे. बलवंतराय मेहता समितीच्या अहवालाच्या अनुषंगानें राज्यांतील आजच्या स्थानिक संघटनांची पुनर्घटना कशी करायची व त्यांना कोणते व कित-पत अधिक अधिकार द्यायचे याबद्दल समितीनें शिफारशी करावयाच्या आहेत. समितीच्या कामाला आरंभ झाल्यापासून या विषयाच्या चर्चेला नव्यानें चालना मिळाली आहे. त्या संबंधानें कांहीं महत्त्वाचे वाटणारे प्रश्न उपस्थित करणें व विचारांसाठीं कांहीं सूचना पुढें मांडणें असा मर्यादित हेतु प्रस्तुत लेख-नांत अभिप्रेत आहे.

लोकशाही विकेंद्रीकरण हा एक अत्यंत मौलिक स्वरूपाचा प्रश्न आहे. तो जसा जिव्हाळ्याचा तसाच अडचणीचा व धोक्याचाहि आहे. त्याबाबत एकदां टाकलेलें पाऊल सुधारणें वा मागें घेणें अत्यंत कठिण आहे; व तें चुकीचें ठरल्यास त्यांतून गोंधळ व पांच दहा वर्षांची पीछेहाट हीच पदरांत पडण्याचा संभव आहे. केवळ उत्साह व सद्हेतु यांच्या आधारावर हाताळतां येण्याजोगें त्याचें स्वरूप साधें, सरळ वा सोपें नाहीं. म्हणून खुली चर्चा व विवेक, सावध-पणा व जबाबदारी यावर आधारित कृती यांनाच या बाबतींत महत्त्व मिळालें पाहिजे.

## सदोष कल्पना

"लोकशाही विकेंद्रीकरण" या शब्दप्रयोगावरून सूचित होणारी कल्पना सदोष वाटते हें आरंभींच स्पष्ट करणें जरूर आहे. हा शब्दप्रयोग अनेकवेळां वापरला जातो, मेहता समितीनें व राज्य सरकारनेंहि तो वापरला आहे हें खरें. परंतु त्यामुळें होणारा अर्थबोध व तज्जन्य मानसिक प्रक्रिया विचारांत घेतल्यास त्याऐवजीं "विकेंद्रित लोकशाही" हा शब्द-प्रयोग अधिक उचित व ग्राह्य मानावा लागेल. साम्यवादांतील "डेमोक्रॅटिक सेंट्रलायझेशन"च्या विरोधी कल्पना "डेमोक्रॅटिक डिसेंट्रलायझेशन" ही नसून "डिसेंट्रलाइज्ड डेमोक्रसी" या शब्दां-नींच ती अधिक चांगल्या रीतीनें व्यक्त होते. अवा-स्तव महत्त्व पावलेलें "सेंट्रलायझेशन" हें जसें लोक-शाहीस मारक ठरतें, तसेंच "डिसेंट्रलायझेशन" तिच्या विभजनाला जबाबदार ठरण्याचा संभव आहे.

हा केवळ शब्दाचा प्रश्न नाहीं. लोकशाही विकें-द्रीकरण या शब्दांवरून राज्य व केंद्राकडून गांवाकडे सत्ता देण्याचीच कल्पना प्रामुख्यानें सूचित होते; व असें सत्तासंक्रमण म्हणजेच लोकशाही असा समज दृढ होतो. "लोकशाही हवी ना, तर मग सारी सत्ता गांवाला द्या," अशा तऱ्हेची वेळोवेळीं होणारी घोषणा हेंच स्पष्ट दर्शवते. हा विचार अत्यंत मर्यादित अर्थानेंच खरा आहे. गांवाकडे सर्व सत्ता देणें तर राहोच; पण अशा प्रकारच्या मर्यादित सत्ता-संक्रमणांत देखील जशी लोकशाही दृढ होण्याची शक्यता आहे तशीच सामाजिक विभजनाची देखील भीति आहे. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे वरील मागणी करणारे बहुधा गांवाच्या पातळीवर मात्र शासनात्मक, आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक, शैक्ष-णिक, इ० सर्व प्रकारचा व्यवहार एकाच संघटने-मार्फत चालला पाहिजे असा आग्रह धरतांना आढ-ळतात. संघराज्य वा राज्य यांच्याप्रमाणेंच गांवाच्या पातळीवर देखील तेथील मर्यादांत कां होईना पण केंद्रीकरण संभवतें ही गोष्ट त्यांच्या नजरेंतून पूर्णतया








निसटते. केंद्रीकरण म्हणजे दिल्ली वा मुंबईची सत्ता हा अत्यंत मर्यादित अर्थानें खरा पण बव्हंशीं चुकीचा समज दृढ होतो. केवळ भौगोलिक विकेंद्रीकरणाचा हा मर्यादित व एकांगी विचार अत्यंत तुजबी व अपुरा आहे. दिल्ली वा मुंबईचें केंद्रीकरण हें जसें लोकशाहीस विघातक तसेंच गांवांतील एकाद्या "दादा"च्या हातीं होणारें केंद्रीकरणहि समजलें पाहिजे. केंद्रीकरण व विकेंद्रीकरण हे हुकूमशाही व लोकशाही यांच्याशी जुळणारे समान व्याप्तीचे व स्वरूपाचे शब्द नव्हत. गांवांतील दादागिरीला आळा घालणारा केंद्रीय हस्तक्षेप हा लोकशाहीस बाधक नसून पोषकच मानावा लागेल.

याउलट विकेंद्रित लोकशाहींत सामान्य नागरिकाचें लक्ष्य सत्तेवर केंद्रित न होतां तें मूल्यें, कार्यक्षमता, कार्यपद्धति इ० कडेच आकर्षित होण्याचा संभव आहे. या दृष्टिकोनांतून विकेंद्रीकरण हा केवळ स्थानिक संस्थांना सत्ता वा अधिकार देण्याचा प्रश्न राहात नाहीं. स्थानिक पातळीवर लोकशाही रुजावी, तिनें मुळें धरावींत व देशांतील लोकशाहीला भक्कम पाया निर्माण व्हावा यासाठीं उपयोगी पडणारें तें एक महत्त्वाचें साधन बनतें. त्याबरोबरच कोणत्याहि पातळीवरील केंद्रीकरण हें अनिष्टच होय हेंहि त्या योगानें स्पष्ट होतें.

## परंपरेची पार्श्वभूमि

भारतांत ग्रामराज्यांची अत्यंत जुनी व दीर्घकालीन परंपरा असल्यामुळें येथें लोकशाही विकेंद्रीकरण्याच्या आधारावरच रुजूं शकेल; आमच्या लोकशाहीचें हेंच वैशिष्ट्य असलें पाहिजे; त्या योगानेंच तिचें स्वरूप येथील जीवनाशीं संवादी बनूं शकेल असें विकेंद्रीकरणाच्या पुरस्कर्त्यांचें काहीं वेळा म्हणणें असतें. हा दृष्टिकोन सकृद्दर्शनीं बरोबर वाटला तरी त्यांत काहीं अडचणी आहेत; व म्हणून तो तपासून घेणेंच अधिक उचित होईल.

ग्रामराज्यांची ही परंपरा संघटित मध्यवर्ती शासनाच्या अभावाचीहि परंपरा होय. यामुळें तिच्यांत स्वयंपूर्ण खेडें अभिप्रेत होतें. आजच्या सामाजिक-जीवनाची कोणतीहि बाजू ध्यानांत घेतली तरीहि स्वयंपूर्णतेची कल्पना स्वप्नमय वाटल्यावांचून राहात नाहीं. तिचा पुरस्कार करणाराला केवळ केंद्रीकरणच नव्हे तर सर्वच आधुनिक जीवनाचा त्याग करण्यांस तयार व्हावें लागतें; व त्याचा स्वप्नाळुपणा स्पष्ट होतो. उलट, वस्तुस्थितीची दखल घ्यायची म्हणजे संघटित मध्यवर्ती सत्तेची गरज स्वीकारणें भाग पडतें; व परंपरागत खेड्याऐवजीं व्यापक राष्ट्रीय पातळीवरील संघटित लोकशाहीचा पाया म्हणूनच खेड्याचा विचार करावा लागतो. केंद्रीय शासनाचा खेडें हा पर्याय राहात नाहीं उलट तें आधार बनतें. खेडें मजबूत करण्याची गरज आहेच पण तसें करण्यांत काहीं वेळां अंतर्भूत होणारी सामाजिक विभजनाची संभाव्यता या दृष्टीकोनामुळें टाळतां येते. तात्पर्य, आजच्या विकेंद्रीकरणाच्या विचारांत परंपरागत खेड्याची पुनर्निर्मिती अभिप्रेत नसून नव्या खेड्यांच्या निर्माणाचा तो विचार आहे.

परंपरागत गांवाची कल्पना सामाजिक स्थैर्य सूचित करणारी आहे, हें खरें; पण तिच्यात प्रगमनशीलता, प्रवाह वा गति यांचा अभावच आढळतो. बव्हंशीं स्वयंपूर्णतेलाच प्राधान्य दिलें गेल्या कारणानें दारिद्य, जीवनाची खालावलेली पातळी, तंत्रविद्या व शिक्षण यांची अत्यंत तुजबी वा तुटपुंजी अवस्था हीं त्यांत अपरिहार्यपणें स्वीकारावीं लागतात. उलट आज या सर्व गोष्टी नाहींशा व्हाव्यात अशा म्हणजे विकासाच्या दिशेनें पावलें टाकलीं जात आहेत. विकासाचा अर्थच मुळीं असा आहे कीं त्यायोगानें गांवाचे अन्य गांवांशीं, शहराशीं, राज्याशीं व संघराज्याशीं हजारों निरनिराळया धाग्यादोऱ्यांनीं संबंध जोडले जावेत. स्थानिक पातळीवरील शेती, जनावरांची निगा, स्वच्छता, आरोग्य, रस्त्यांची बांधणी,













अनुक्रमणिका

शिक्षण इत्यादि एकहि कार्यक्षेत्र असें नाहीं कीं ज्यांतील आपली जबाबदारी पार पाडण्यासाठीं गांवाला इतरांवर या ना त्या रूपानें अवलंबून राहावें लागूं नये. म्हणूनच सर्व अधिकार गांवाला द्या, सारी सत्ता गांवाकडे राहिली पाहिजे इत्यादि विधानें बव्हंशीं अर्थशून्य घोषणांच्या स्वरूपाचीं ठरतात. गांव हा विकासाचा पाया असल्यानें राष्ट्रीय वा प्रादेशिक विकासकार्याची गति बऱ्याच अंशीं गांवाच्या उत्साहावर, क्षमतेवर, प्रयत्नावर अवलंबून राहील हें खरें. पण त्याबरोबरच सगळाच विकास गांवाच्या पातळीवर साधतां येणार नाहीं हेंहि तितकेंच खरें आहे. म्हणून विकेंद्रीकरणाचा प्रश्न हा मुख्यत्वें गांवाला सत्ता देण्याचा प्रश्न नाहीं; त्याचें स्वरूप यापेक्षां अधिक गुंतागुंतीचें आहे. आपल्या सर्वांगीण विकासाचे आपल्या कक्षेतील प्रयत्न करणें व अन्य पातळीवरील विकासप्रयत्नांना सर्व प्रकारें शक्य तें साहाय्य देणें असें गांवाच्या कार्याचें दुहेरी स्वरूप बनतें; व विकासकार्याच्या जबाबदारीचा आपला वाटा उचलीत असतांना त्याबरोबरच गांवाच्या पातळीवर सुरूं असलेल्या प्रयत्नांना सर्व प्रकारचें उत्तेजन, सहकार्य व साहाय्य देऊन त्यांच्या यशस्वितेसाठीं अनुकूल वातावरण निर्माण करण्याची जबाबदारी इतरांवर पडते. ही जबाबदारी तालुका, गट, जिल्हा, राज्य, संघराज्य इत्यादि पातळींवर विभागली जाईल हें खरें. पण यांतील बव्हंशी वाटा राज्यसरकारलाच उचलावा लागेल; मग तो प्रत्यक्ष असो वा अप्रत्यक्ष !

## आणखी एक बाजू

विकेंद्रीकरणाचा विचार करतांना आणखी एक बाजू ध्यानांत घेणें जरूर ठरतें. या प्रश्नासंबंधीं लोकशाहीवर श्रद्धा असणारांमध्यें देखील दोन आत्यंतिक भूमिका आढळतात हें प्रसिद्ध आहे. काहींचा या कल्पनेला अत्यंत तीव्र स्वरूपाचा विरोध असून या बाबतींत तूर्त तरी अधिक काहींहि करतां कामा नये असें त्यांचें आग्रहाचें म्हणणें आहे. या भूमिकेचें समर्थन काहीं वेळां अननुभवांतून होणाऱ्या चुका, गुंडगिरी, वशिलेबाजी, लांचलुचपत इत्यादि सामान्य कारणांच्या आधारानें करण्यांत येतें. व विकेंद्रीकरणाच्या पुरस्कर्त्यांकडून या सर्व विधानांना काहींसें रास्त तर काहींसें भावनामय, कटु किंवा आव्हानात्मक उत्तरहि मिळतें. या वादांत येथें पडण्याचें कारण नाहीं. तूर्त वरील आत्यंतिक भूमिकेच्या मुळाशीं असलेल्या एका प्रश्नाचाच थोडक्यांत ऊहापोह करणें इष्ट होईल. व तो प्रश्न म्हणजे गांवांत आढळणारा सामाजिक एकजिनसीपणाचा अभाव हा होय.

हाच मुद्दा जातिसंस्थेचें प्राबल्य या स्वरूपांत मांडण्यांत येतो. जातीय भावना ही सामाजिक उच्च-नीच श्रेणींवरील वा उतरंडीवरील श्रद्धेपासून अलग करतां येत नाहीं. ही श्रद्धा कायम असल्यास तिच्या योगानें ग्रामसमाजाची धारणा होऊं शकते. पायरीला पाय न लावणें ही अशा धारणेची मौलिक गरज असते. आजच्या ग्रामीण समाजांत ही श्रद्धा जवळजवळ नष्ट झाली आहे हें उघड आहे. व अत्यंत उचितहि आहे. तथापि उतरंडीवरील श्रद्धेचा ऱ्हास हा जातीय भावनेचा ऱ्हास होय असें समीकरण मांडतां येत नाहीं ही खरी अडचण आहे. उलट गेल्या दहावीस वर्षांत जातीय भावना कितीतरी अधिक प्रबळ झाल्याचेंच दिसून येतें. व या दोन प्रवृत्ति ( उतरंडीवरील श्रद्धेचा ऱ्हास व जातीय भावनेची वाढ ) एकत्र ध्यानांत घेतल्या म्हणजे त्यांतून सामाजिक विभजन हाच निष्कर्ष निघूं शकतो. ग्रामशासनाची उभारणी डोईस एक मत या तत्त्वावर झाली कीं त्याचे सर्व निर्णय हे लोकशाही निर्णयच समजले पाहिजेत हा एक अत्यंत औपचारिक व अपुरा विचार आहे. उलट सर्व निर्णय एकमतानें घ्यावेत हा अनाठायी आदर्शवादी आग्रह आहे. चिठ्या टाकून निवडणुका वा निर्णय घेणें ही



अनुक्रमणिका




तर बुद्धीच्या पराभवाचीच कबुली वाटते. तात्पर्य, एकजिनसीपणाच्या अभावांतून उद्‌भवणारी भीति आजच्या परिस्थितींत तरी बरीचशी रास्त ठरते. डोईस एक मत ही जशी लोकशाहीची गरज आहे तशीच व तितकीच महत्त्वाची गरज म्हणजे संघ-टित स्वरूपाच्या " कायमच्या " बहुमत-अल्प-मताचा अभाव ही होय. जातीय भावनेमुळें ही दुसरी गरज पूर्ण होऊं शकत नाहीं; उलट ग्रामीण जीवनांत संघटित गटांतील कलहांचा प्रादुर्भाव होण्याची शक्यता बळावते. मतदान व निवडणुकी यांतून हे कलह निर्माण होतात हें विधान पटूं शकत नाहीं. कलहांचा उद्भव ज्या सामाजिक पार्श्वभूमींत मतदान व निवडणुका होतात तिच्यांत आहे. मत-दान व निवडणुका टाळणें कठीण आहे; किंबहुना तसें करण्याची गरजहि नाहीं. त्यांच्यासंबंधीचा दृष्टि-कोण सुधारण्याची खरी आवश्यकता आहे. मतदान हें केवळ अधिकार कोणी चालवावा हें ठरविण्याचें साधन नव्हे; अधिकारक्षेत्राचें स्वरूप, त्यांतील विविध प्रश्नोपप्रश्न व त्यासंबंधीचे भिन्नभिन्न दृष्टिकोण, बहुमतानें निर्णय घेण्याच्या पद्धतीचें इष्टत्व व तिच्या मर्यादा, आणि निर्णय अमान्य असणारांचे-मग ते एक असोत कीं अनेक-तो बदलून घेण्यासाठीं बहुमत तयार करण्याचें स्वातंत्र्य अबाधित राखण्याची मौलिक गरज इत्यादि बाबतींत नागरिकांना शिक्षण देण्याचेंहि तें एक महत्त्वाचें साधन आहे. तात्पर्य, लोकशाहीचीं मूल्यें व व्यवहार यांचें जतन करणें व तीं सतत अधिकाधिक खोल रुजत जातील अशा प्रकारच्या कार्यपद्धतीचा अवलंब करणें हें ग्रामशासनाच्या विकासाचें एक महत्वाचें गमक समजलें पाहिजे. विकेंद्रीकरण हा केवळ शासनात्मक प्रश्न नसून तो एक महत्त्वाचा लोकशिक्षणाचा प्रयोग आहे ही जाणीव नेहमीं कायम राहिली पाहिजे.

### नियोजनाची गरज

विकेंद्रीकरणाचा हेतु स्पष्ट करतांना देशांतील आजच्या आर्थिक नियोजनाची ती एक महत्वाची गरज आहे असें म्हटलें जातें. " पहिल्या दोन्ही पंचवार्षिक योजनांच्या बाबतींत जनतेचें अपेक्षित सहकार्य मिळूं शकलें नाहीं; उलट, उत्साहाऐवजीं उदासीनतेचा प्रत्यय आला. लोकशाही नियोजनाच्या दृष्टीनें ही परिस्थिति अत्यंत अनिष्टच समजली पाहिजे. म्हणून ती सुधारण्यासाठीं ताबडतोब उपाय-योजना करणें आवश्यक आहे. योजनेची अंमल-बजावणी करण्याच्या कामांत जनतेला सहभागी होतां आल्यास तिच्या ठिकाणीं योजनेबाबत उत्साह निर्माण होऊं शकेल. असा भाग घेण्याची संधी सामान्य जनतेला प्राप्त व्हावी यासाठीं लोकशाही विकेंद्रीकरण हा मार्ग होय. " असें या बाबतच्या विचारसरणीचें स्थूल स्वरूप सांगतां येईल.

हा दृष्टिकोण अत्यंत महत्वाचा आहे याविषयीं दुमत होण्याचें कारण नाहीं. योजनांची अंमलबजा-वणी करण्याची जबाबदारी स्थानिक संस्थांवर टाका-यची म्हणजे त्यासाठीं साधनेंहि त्यांना प्राप्त झालीं पाहिजेत हें उघड आहे. राज्यानें संपत्ति गोळा करायची व मग ती स्थानिक संस्थांना अनुदानांच्या रूपानें पुरवायची ही पद्धत काहींशी अपरिहार्य असली तरी काहीं प्रमाणांत अकारण त्रासाची व खर्चाची आहे. त्याऐवजीं विशिष्ट प्रकारचे कर वसूल करण्याची व गोळा होणारा पैसा वापरण्याची मुभा स्थानिक संस्थांना देणें आवश्यक आहे. विकें-द्रीकरणाच्या उपक्रमांत हें मान्य केलें गेलें आहे. व त्यामुळें त्यासंबंधीं होत असलेला विचार बराच व्यापक झाला आहे हेंहि उघड आहे.

तथापि योजनेच्या संदर्भांत बोलायचें झाल्यास वरील दृष्टिकोनांत एक महत्वाची अडचण प्रत्ययास येते. अंमलबजावणीची किंवा योजना पूर्तीची जबाबदारी म्हणजे विकासखर्च करण्याची जबाबदारी असें सामान्यतः समीकरण मांडलें जातें. साधन-सामुग्री उभारण्याच्या कल्पनेचा त्यांत बहुधा अंतर्भाव केला जात नाहीं. एकदां विनिमय किंवा खर्च ही



अनुक्रमणिका




योजनेंतील मध्यवर्ती कल्पना मानली गेली कीं अंमलबजावणीची जबाबदारी म्हणजे खर्च कोणी करावयाचा या विषयींचा अधिकार हा विचार आपोआप पुढें येतो व ओंढाताणीस आरंभ होतो. गांवाला हा अधिकार दिल्यास त्यांतून गुंडगिरी, वशिलेबाजी, लांचलुचपत इत्यादींची वाढ होईल अशी भीति व्यक्त केली जाते. एकीकडे हे हक्क मर्यादित स्वरूपांतच दिले पाहिजेत, वरील अनिष्ट गोष्टींपासून ग्रामपंचायतीचा व्यवहार सुरक्षित राहील याबद्दलची तरतूद ( सेफगार्ड्स् ) ठेवलीच पाहिजे असा आग्रह धरला जातो व दुसरीकडे अशा तरतुदी किंवा मर्यादा हीं जनतेच्या स्वातंत्र्यावरील बंधनेंच होत, ही खरीखुरी लोकशाही नव्हे, विकेंद्रीकरणाचा हा केवळ आभास किंवा देखावा आहे अशा प्रकारची हाकाटी सुरू होते. या दोन दृष्टिकोनांतील एकाद्या विशिष्ट अवस्थेंत साधलेला समेट हा दोन्ही बाजूंना असमाधानकारक वाटण्याचा व म्हणून दोन विरुद्ध दिशांनीं ताणला जाण्याचाच संभव अधिक; यामुळें प्रत्यक्ष व्यवहारांत तो निरुपयोगी ठरतो. जनतेंत त्या योगानें उत्साह निर्माण होण्याऐवजीं असंतोष, कार्याविषयीं अविश्वास वा तुच्छता, प्रसंगीं विरोध, याच भावना वाढीस लागतात; व विकासकार्य हें अडचणींच्या भोंवऱ्यांत सांपडतें.

## विकेंद्रीकरणाचा मार्ग

विकेंद्रीकरणाचा मार्ग हा या भोंवऱ्यांतून बाहेर पडण्याचा मार्ग असला पाहिजे. गेल्या दोन योजनांचा परिणाम म्हणून जनतेच्या सुप्त शक्ती आतां जागृत होऊं लागल्या आहेत, शथिल्याचें स्थान प्रयत्नशीलता घेत आहे, दारिद्र्य व अज्ञान यांच्या बंधनांतून मुक्त होण्यासाठीं आवश्यक त्याग व श्रम करण्यास लोक तयार होत आहेत असें कांहीं वेळां म्हटलें जातें. व तें कांहीं प्रमाणांत खरेंहि आहे. परंतु त्याबरोबरच वर उल्लेख केलेली पार्श्वभूमि ध्यानांत घेतल्यास या वरवर आढळणाऱ्या जागृतींत निरोगी व रचनात्मक भाग किती व केवळ अधिकार किंवा सत्ता लालसेंतून जन्मलेला रोगट भाग किती, यासंबंधीं शंका येणें शक्य आहे. या जागृत होऊं लागलेल्या शक्तींचा रचनात्मक आविष्कार व्हावा, त्यांना इष्ट तें वळण लागावें व त्यांची सतत जोपासना व वाढ होईल अशी तरतूद असावी या दृष्टीनें विकेंद्रीकरणाकडे पाहिलें पाहिजे. संघटनेपेक्षां कार्याला, खर्चापेक्षां क्षमतेला, ठराविक कामापेक्षा नवीन उपक्रमाला, सत्तेविषयीच्या जागरूकतेऐवजीं जबाबदारीच्या व सहकार्याच्या भावनेला, व प्रातिनिधिकता व बहुमत यांच्यापेक्षां माणुसकी, एकजिनसीपणा व खेळीमेळीचे निर्णय यांना त्यांत अधिक महत्त्व दिलें गेलें पाहिजे.

लोकशाही खोलवर रुजलेल्या व विकासाला अनुकूल मनोभूमिका असलेल्या स्थानिक संस्थांची परंपरा येथें असती तर हा प्रश्नच उद्भवण्याचें कारण नव्हतें. जुनी परंपरा किंवा अलीकडील इंग्रजी राजवटींतील इतिहास यांची उजळणी येथें करण्याचें कारण नाहीं. तथापि या पार्श्वभूमींतून निघणारे एकदोन वादातीत निष्कर्ष येथें नमूद करण्यास हरकत नाहीं. अधिकारांचा वापर करण्याचें, जबाबदारी स्वीकारण्याचें, लोकशाही पद्धतीनुसार काम करण्याचें प्राथमिक शिक्षण घेण्याचीं केंद्रें म्हणजे स्थानिक संस्था होत. अशी सर्वमान्य भूमिका आहे. त्यांत आजच्या परिस्थित्यनुरूप विकासशीलतेची कल्पना भरीस घालणें आवश्यक आहे. त्यामुळें स्थानिक संस्थांच्या अधिकारांचें व जबाबदारीचें क्षेत्र ठराविक कामापुरतें मर्यादित न राहातां सतत वाढत जाणारें बनेल हें उघड आहे. दुसरें म्हणजे या दृष्टिकोनांतून पाहायचें म्हटल्यास सर्व ग्रामसंस्थांना सारखेंच लेखतां येत नाहीं, एकाच मापानें मोजतां येत नाहीं ही गोष्ट ध्यानांत घेतली पाहिजे. विकेंद्रीकरणाविषयीं आज बव्हंशानें होणारा विचार हा समतेच्या या सदोष व



अनुक्रमणिका






यांत्रिक व्यवहारावर आधारलेला आहे. राज्यानें स्थानिक संस्थांची जोपासना करायची म्हटलें कीं त्यांना कायद्यानें विशिष्ट हक्कांचें, अधिकारांचें व जबाबदारीचें स्थान देण्याची कल्पना आलीच; व मग हें स्थान निश्चित करतांना एकीकडून उत्तम प्रकारें चाललेल्या व दुसरीकडून विविध दोषांनीं भरलेल्या ग्रामसंस्थांचे दाखले पुढें येऊं लागले कीं गोंधळ उडाल्यावांचून राहात नाहीं. या गोंधळांतून बाहेर पडण्यासाठीं पळवाटाहि अनेक काढल्या जातात. "कांहींच करण्याची गरज नाहीं" हा एक सूर तर "अधिकार दिल्यावांचून वापर करतां येणार कसा, पाण्यांत पडल्यावांचून पोहतां कसें येणार ?" हा दुसरा. निष्क्रियतेचा आदेश या बाबतींत त्याज्यच होय. परंतु त्यावरून कृतींत सावधपणा असू नये असें मात्र सूचित होत नाहीं. पाण्यांत पडल्यावांचून पोहतां येत नाहीं हें खरें. परंतु याचा अर्थ एखाद्या नवशिक्याला महापुराच्या पाण्यांत टाकावें असा नाहीं. त्यासाठीं प्रथम लहानसें तळें वा विहीरच पाहिजे, त्यांतहि पाण्याची खोली क्रमशः वाढत गेल्यास उत्तम; व सर्वांत महत्त्वाची गरज म्हणजे प्रसंगीं बाहेर काढूं शकेल अशा उत्तम पोहणारांचें सान्निध्य ! या सर्व गोष्टी सावधपणाच्या सूचक आहेत. तात्पर्य ग्रामसंस्थांच्या कायदेशीर स्थानाविषयीं निश्चितपणा दर्शवणारा व कार्यवाढीला वाव देणारा पण प्रत्यक्ष कामानुसार त्यांच्यांत श्रेणी लावणारा कायदा हाच या प्रश्नाबाबत श्रेयस्कर मार्ग वाटतो. विकेंद्रीकरणाचे आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक हेतु योग्य रीतीनें साध्य होण्यासाठीं विकेंद्रीकरणाचा मार्ग हा केवळ सत्तादानाचा मार्ग न राहतां "साहे ओझें त्यासि तेंचि द्यावें" यावर त्याची उभारणी झाली पाहिजे. अर्थात् ओझें देण्याच्या, जबाबदारी टाकण्याच्या या कल्पनेंत सत्तासंक्रमण येतेंच हें निराळें सांगण्याची गरज नाहीं.

जबाबदारी व सत्ता, कर्तृत्व व अधिकार यांचीं सांगड घालण्याचा हा उपक्रम अनेक दृष्टींनीं अधिक श्रेयस्कर ठरेल अशी अपेक्षा बाळगतां येते. सत्ता प्राप्त झाल्यानें ती वापरण्याची कुवत अंगीं येते ही कल्पना सर्वस्वीं खरी नाहीं. कित्येकवेळां उलटाच अनुभव येणें शक्य आहे. म्हणून दोहोंची सांगड घालण्याचा प्रयत्न अधिक योग्य ठरतो. त्यांतून उद्भवणाऱ्या प्रत्यक्ष कार्याच्या महत्वामुळें स्थानिक पातळीवर नव्या नेतृत्वाची निर्मिती व जोपासना होण्याची शक्यता बळावते. लोकशाहीची वाढ व्हावी, तिचीं बीजें खोलवर रुजावींत यासाठीं नवें नेतृत्व निर्माण होणें आवश्यक आहे. सामाजिक, आर्थिक वा राजकीय व्यवहाराच्या सर्व पातळीवर नवा विचार, दृष्टिकोन व त्यांतून होणारा व्यवहार यांना अधिकाधिक महत्त्व प्राप्त होत जाणें व नवनव्या व्यक्तींच्या कर्तृत्वाला सतत वाव मिळणें ही नवें नेतृत्व निर्माण होण्यांतील मध्यवर्ती कल्पना होय. स्थानिक पातळीवर हितसंबंध, जातगोत, गुंडगिरी इत्यादींचें प्राबल्य होण्याच्या, वा व्यवहारांत वशिलेबाजी, लांचलुचपत व तत्सम अनिष्ट प्रवृत्ति शिरण्याच्या संभाव्यतेवरहि हाच टिकाऊ स्वरूपाचा उपाय होऊं शकेल. योजना व विकासप्रयत्न या संबंधानें उत्साह निर्माण करण्याच्या व ग्रामीण जनतेचें सहकार्य मिळवण्याच्या दृष्टीनेंहि हा मार्ग अधिक अनुकूल व उपयुक्त ठरणें संभवनीय आहे. फारसा विचार न करतां केल्या जाणाऱ्या अवास्तव मागण्या व त्या पूर्ण न झाल्यानें निर्माण होणारा वा केला जाणारा अकारण असंतोष या दोहोंनाहि त्यांत अवकाश नाहीं. उलट, प्रत्यक्ष कार्याला महत्त्व दिल्यानें त्याविषयीचा जिव्हाळा व जबाबदारीची जाणीव हींच त्याच्या योगानें वाढीस लागूं शकतील.

### श्रेणीचे निकष

श्रेणीची कल्पना मान्य केली कीं ती ठरवायची कशी व कोणी हा प्रश्न आपोआपच पुढें येतो. श्रेणी



अनुक्रमणिका






ठरविण्यासाठीं लावायचे निकष हे वस्तुनिष्ठ असले पाहिजेत हें उघड आहे; व त्याबाबतींतला तपशीलहि शक्य तितका स्पष्ट असावयास हवा. या दोन्ही बाबतींत अगदीं शंभर टक्के समाधानकारक उत्तर ताबडतोब सांपडेलच असें नाहीं. कदाचित् काहीं प्रमाणांत अनुभवाधिष्ठित व प्रायोगिक पद्धतीनेंच पुढें जावें लागेल. ही मर्यादा स्वीकारूनच येथें काहीं निकष सुचवायचे आहेत. कोणतीहि ग्रामसंस्था वा पंचायत : ( १ ) आपलीं नित्याचीं म्हणून समजलीं गेलेलीं कामें कितपत दक्षतेनें, क्षमतेनें व व्यवस्थितपण पार पाडते; ( २ ) नित्याच्या व अन्य स्थानिक कार्यांच्या विकासाबाबत आपल्या प्रयत्नांनीं कितपत जबाबदारी उचलण्यास तयारी दाखवते; ( ३ ) नजीकच्या इतर पंचायतींचें सहकार्य मिळवून वा त्यांना सहकार्य देऊन आपले विकासाचे प्रश्न कितपत सोडवते; ( ४ ) राज्य वा संघराज्य यांच्या विकासकार्याच्या पूर्तीसाठीं देतां येण्यासारखें सहकार्य कितपत देते; ( ५ ) विकासकार्यासंबंधीं जिव्हाळा निर्माण करून योजनेबाहेरील स्थानिक विकासकार्यें हातीं घेण्याचा व स्वप्रयत्नांनीं तीं पार पाडण्याचा कितपत प्रयत्न करते; व ( ६ ) आपल्या कार्यपद्धतीनें ग्रामीण जीवनांत एकजिनसीपणा निर्माण करण्यांत कितपत यश मिळवते; या सर्व गमकांच्या आधारावर तिचें स्थान ठरवितां येणें शक्य आहे. नित्याचा व्यवहार, विकास व सामाजिक एकजिनसीपणा हीं तीन क्षेत्रें या गमकांच्या मुळाशीं आहेत. पहिल्या दोन क्षेत्रांच्या बाबतींत वस्तुनिष्ठ कसोट्या काढणें कठिण असलें तरी अगदीं अशक्य आहे असें नाहीं. ग्रामपंचायतींच्या त्या क्षेत्रांतील कामाचें मोजमाप करतां येणें शक्य आहे. शेवटच्या क्षेत्राबाबत मात्र काहीं अप्रत्यक्ष कसोट्या शोधून काढणें आवश्यक ठरेल. किती निवडणुका बिनविरोध झाल्या, किती निर्णय एकमुखानें घेतले गेले, व्यक्त झालेल्या विरोधाचें स्वरूप कोणतें व त्याची दखल कशा प्रकारें घेतली गेली इत्यादि गोष्टी याबाबत सुचवतां येण्यासारख्या आहेत.

## आणखी एक मुद्दा

या बाबतींत आणखीहि एक मुद्दा विचारांत घेण्यासारखा आहे. व तो म्हणजे खालपासून वरपर्यंत केवळ प्रतिनिधीसत्तेचा सर्रास वापर यासंबंधीं हा होय. संघराज्य, राज्य वा जिल्हाच नव्हे तर तालुका किंवा ब्लॉक इतपत देखील प्रतिनिधीसत्ता अपरिहार्य वाटणें ठीक आहे; परंतु गांवाच्या पातळीवर देखील ती अपरिहार्य कां वाटावी हा एक प्रश्नच आहे. लोकराज्य म्हणजे लोकप्रतिनिधीचें राज्य हें एक सोयीचें समीकरण आहे; त्यांत तत्त्व अभिप्रेत नसून व्यावहारिक दृष्टीनें अगतिकता व्यक्त झालेली आहे. या दृष्टीनें ग्रामशासनानें घेण्याचे कांहीं प्रकारचे निर्णय तरी गांवांतील वयांत आलेल्या सर्व स्त्रीपुरुषांच्या संमतीनें घेण्याचें व खुली चर्चा आणि गुप्त मतदान हा ही संमति मिळवण्याचा मार्ग म्हणून स्वीकारण्याचें बंधन त्यावर कां असूं नये हा एक प्रश्नच आहे. गांवांतील जनतेनें गांवच्या कारभाराकरितां देखील केवळ प्रतिनिधी निवडून द्यावेत व नंतर स्वस्थ बसावें हें फारसें उचित नाहीं. विशेषतः स्थानिक पातळीवरील विकासकार्यांच्या दृष्टीनें ग्रामपंचायतीबरोबरच ग्रामसभेची संघटना गृहीत धरून गांवातील सर्व वयांत आलेल्या स्त्रीपुरुषांना विशिष्ट अधिकार देण्याचा प्रयोग करून पहाण्यासारखा आहे. कांहीं निर्णय घेण्यांत कां होईना पण प्रत्यक्ष भाग घेण्याची संधी मिळाल्यास जनतेंतील उत्साह त्यायोगानें अधिक वाढीस लागेल अशी अपेक्षा बाळगतां येते. व या दृष्टीनें या प्रश्नाकडे पाहणें अगत्याचें आहे. अर्थात् या बाबतींत गांवाची लोकसंख्या विशिष्ट मर्यादेंतच असेल हें गृहीत धरलें आहे.

## कांहीं शंका व उत्तरें

ग्रामपंचायतींची श्रेणी लावण्याच्या व त्या अनुरूप त्यांना अधिकार देण्याच्या या कल्पनेसंबंधीं एक










अनुक्रमणिका

दोन महत्वाच्या शंका येथें शक्य आहे. प्रथमतः ही कल्पना पंचायतींना सर्व अधिकार देण्याच्या पार्श्वभूमीवर मांडलेली नाहीं हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. सर्व अधिकार देण्याची कल्पना ही चुकीची आहे असाच येथें दावा करण्यांत आला आहे. शासनाच्या दृष्टीनें ज्या बाबतीत लवचिकपणाचें धोरण धोक्याचें ठरूं शकतें असे अधिकार देण्याचा प्रश्नहि उद्भवत नाहीं. ही मर्यादा ध्यानांत घेतली म्हणजे द्यावयाच्या सत्तेची, अधिकाराची एक कमाल‌ीची पातळी निश्चित करणें आवश्यक ठरतें. व त्याबरोबरच एक किमान पातळीहि असणें जरूर आहे. श्रेणीनुरूप द्यावयाच्या अधिकारांतील फेरबदल या दोन मर्यादांत होऊं शकेल.

याबाबत एक प्रश्न असा उद्भवतो कीं काहीं ठिकाणीं किमान अधिकारांचा वापर करण्याच्या क्षमतेचा देखील अभाव असणें शक्य आहे तेथें काय करायचें ? या ठिकाणीं आवश्यक भूमिका व कुवत निर्माण करण्याची जबाबदारी वरच्या पातळीवरील संघटना—म्हणजे ब्लॉक वा तालुका —आणि राज्यशासन यांनीं उचलली पाहिजे; व त्यांचे प्रयत्नहि प्राथमिक गरज पुरी होण्यासाठीं अशा ठिकाणीं केंद्रित झाले पाहिजेत. श्रेणी लावण्याचा मार्ग हा पुढारलेल्यांनीं पुढें जाण्याचा व मागासलेल्यांनी मागें राहाण्याचा मार्ग ठरतां कामा नये. सर्वांचा दर्जा सुधारण्याचें तें एक साधन ठरलें पाहिजे. ही जबाबदारी कायद्यानें टाकणें व ती पार पाडण्याचे प्रयत्न होतील अशी दक्षता घेतली जाणें आवश्यक आहे.

दुसरा प्रश्न म्हणजे सत्तेची कमाल मर्यादा गांठलेल्या पंचायतीचा होय. ही मर्यादा गांठल्यानंतर जर तिच्या कार्यांत शैथिल्य येऊं लागलें, अनिष्ट प्रवृत्ति घुसूं लागल्या तर काय करायचें असा हा प्रश्न आहे. तथापि हा धोका थोडासा कमी प्रमाणांत संभवतो. वरची श्रेणी गांठण्याच्या उपक्रमांत गांवांतील जनतेची जाणीव विकास पावेल, जागरूकता व आकलन शक्ति वाढेल. यामुळें अशा स्वरूपाच्या धोक्याविरुद्ध आवश्यक ती सामाजिक व सांस्कृतिक हमी ग्रामीण समाजांत निर्माण झाली असण्याचा संभव आहे. तरीदेखील ही शक्यता सर्वस्वीं नाहीशी होईल असें समजण्याचें कारण नाहीं. यामुळ खालच्या पायरीवरून वर जाण्याच्या संधी बरोबरच वरूनखालीं येण्याची तरतूदहि कायद्यानें असणें आवश्यक ठरतें. मिळालेल्या अधिकारांमुळें व्यवहार सुधारण्याऐवजीं बिघडूं लागल्यास ते जाऊं शकतील याची जाणीव ग्रामशासनांत सातत्यानें असणें यांत आक्षेप घेण्यासारखें कांहींहि नाहीं असें वाटतें.

येथवर विकेंद्रीकरणाच्या प्रश्नाची वैचारिक बैठक तपासण्याचा व त्यासंबंधी कांहीं सूचना पुढें मांडण्याचा प्रयत्न झाला. या प्रश्नांची संस्थात्मक बाजू पुढें विचारांत घेऊं.

---










अनुक्रमणिका

॥ श्री ॥

# दि बृहन्महाराष्ट्र शुगर सिंडिकेट लि०, पुणें-२.

हें सारस्वताचें गोड । तुम्हींचि लाविलें जी झाड ।
तरी अवधानामृतें वाड । सिंपोनि कीजे ॥
मग हें रसभाव फुलीं फुलेल । नानार्थ फळभारें फळा येईल ॥ (ज्ञानेश्वरी)

महाराष्ट्रांतील जनतेचें सहाय्य व सहकार्य
कै. श्री. आगाशे यांचे अविरत श्रम आणि
त्यांनी ठरवून दिलेल्या धोरणाप्रमाणें संचालक मंडळानें चालविलेला
कंपनीचा कारभार यामुळेंच सिंडिकेटचा कारखाना यशस्वी झाला आहे.

कंपनीच्या रौप्यमहोत्सवाचे वर्षीं ऑर्डिनरी शेअरवर २० टक्के (करपात्र)
डिविडंड देऊन क. चंद्रशेखर गोविंद आगाशे यांची इच्छा पुरी
करतां आली याबद्दल संचालक मंडळास आनंद होत आहे.

**नवीन हंगाम दिवाळी नंतर सुरूं होईल.**

**आमचे भागीदार, ठेवीदार व हितचिंतक यांना**
**नूतन वर्ष सुखाचें व भरभराटीचें जावो !**

**संचालक मंडळ**

श्री. शंकर लक्ष्मण लिमये, B. Sc., LL. B., वकील, अध्यक्ष.

श्री. शं. भ. कोंडे देशमूख, व्यापारी.
श्री. ग. ह. सबनीस
श्री. रामराव देशमूख, M. A., LL. B. (Cant.), Bar-at-Law, M. P.
श्री. ज. चं. आगाशे,

श्री. भ. ग. भादुले, B. Sc., LL. B. वकील,
श्री. श्री. र. केसकर, वकील
श्री. वि. कृ. साठे, B. A. (टिळक) माजी पुरवठा मंत्री, मुंबई राज्य.
श्री. गो. न. जोशी, B. Sc.,

श्री. के. व्यं. चाफेकर, B. E., A. M. I. E., मॅनेजर.

श्री. ना. गो. चापेकर

# पुरुषसूक्ताची मीमांसा

ऋग्वेदाच्या अखेरच्या दहाव्या मंडलांतील नव्वदाव्या सूक्ताला पुरुषसूक्त ह्या नांवाने संबोधण्यांत येतें. कोणत्याहि सूक्ताला सूक्तकारांनीं नांव ठेवलेलें नाहीं. पुरुषसूक्त, विष्णुसूक्त, हीं नांवें ब्रह्मकर्मांत त्यांचा उपयोग करण्यांत येऊं लागला तेव्हा याज्ञिकांनी दिलेलीं दिसतात. सूक्ताचा विषय **पुरुष** असल्याने ह्या सूक्ताला पुरुषसूक्त म्हणतात. सूक्ताचा ऋषि, देवता व छंद ह्यांचीच माहिती देण्याचा प्रघात आहे.

## या सूक्ताचा ऋषि व देवता

पुरुषसूक्ताचा ऋषि नारायण समजतात. हा नारायण ऋषि कोठून आणला तें सांगतां येत नाहीं. ह्या ऋषीच्या नांवावर प्रस्तुत सूक्ताखेरीज एकहि सूक्त नाहीं. ह्याची विशेष चिकित्सा न करितां हें सूक्त ऋषिहीन आहे असें धरून चालल्यास हरकत नाहीं. ह्याचा अर्थ सूक्ताचा कर्ता माहीत नाहीं. पुढील विवेचनासाठी ही गोष्ट ध्यानांत ठेवणें अवश्य आहे.

पुरुषसूक्तांतील पुरुष शब्दांचा अर्थ देवाधिदेव—सृष्टि निर्माता असा आहे. ह्या अर्थी पुरुष शब्द ऋग्वेदांत कोठेंहि वापरलेला नाहीं. जेथे तो आला आहे तेथे तो मनुष्यवाचक आहे ( ७।१०४।१५; १०।१६५।३ ). १०-९१-८ मध्यें पुरुषम् ओषधीनाम् असे शब्द आहेत. ह्या ठिकाणीं पुरुष म्हणजे जीवनसत्त्व असा अर्थ असावा. पुरुषादः, पुरुषता, पुरुषघ्न, पुरुषत्रा, पुरुषत्वता ह्या शब्दांत मनुष्यार्थीच पुरुष शब्द आहे. पुरुषत्वता ह्याचा अर्थ सायणाचार्यांनी कामस्य पूरकत्वेन असा केला आहे; तो बरोबर असो वा नसो देव ह्या अर्थी पुरुष शब्द इतरत्र कोठें सापडत नाहीं हें निश्चित. मनुष्यार्थी पुरुष शब्दांत स्त्रियांचा अन्तर्भाव होतो. उलट, पुरुषसूक्तांतील पुरुष शब्दांत स्त्रीचा समावेश होणें शक्य नाहीं.

ह्या सूक्तांत सोळा ऋचा आहेत. पहिल्या ५ मंत्रांत पुरुष, विराट् पुरुष व अधिपुरुष अशा तीन पुरुषांची जन्मकथा आहे. त्यानंतरच्या पांच ऋचांत स्वर्गीय यज्ञाचें कथन असून यज्ञसृष्टि वर्णिली आहे. ११, १२, १३, १४ ह्या ऋचांत पुरुषसृष्टीचें वर्णन आहे. शेवटल्या दोन ऋचांत पुन्हां देवांच्या यज्ञाची हकीकत दिलेली आहे.

## पुरुषाची कल्पना

आतां पुरुषाविषयीं सूत्रकाराच्या काय कल्पना आहेत तें बघूं. त्याला हजारों मस्तकें, हजारों नेत्र व हजारों पाय आहेत. त्याने सर्व भूमि तर व्यापलीच पण शिवाय आणखी दहा अंगुलें शिल्लक राहिला. (ऋ. १). इहलोकाच्या आधारावर ही **पुरुषाची** कल्पना उभारली आहे हें उघड आहे. अखिल जगत् हाच **पुरुष.** मात्र तो जगाला व्यापून उरला म्हणजे जगापेक्षाहि अधिक आहे. अंगुली हें जमीन मोजण्याचें माप. येथे दशांगुली शब्दाने नेमकीं दहा बोटें समजणें उचित नाहीं. अपरिमित हा अर्थच योग्य आहे. दशांगुलं व सहस्रशीर्षा हे शब्द ऋग्वेदांत इतरत्र आढळत नाहींत. जगत् आणि **पुरुष** ह्यांचें तादात्म्य कवीनें मानलें आहे.

इतकें लिहिल्यावर कवीला शंका आली कीं, पृथ्वीवरील प्राणिमात्र केव्हातरी नष्ट होऊन त्यांची जागा दुसरे भरून काढतील. तसेंच आजचे प्राणी जन्मास येण्यापूर्वी प्राणी होऊन गेले त्यांचें काय करावयाचें ? त्याला दुसऱ्या मंत्रार्धांत उत्तर दिलें आहे. भूतकालीन व भविष्यकालीन जगत् हें सुद्धा ईश्वर (**पुरुष**) च आहे. शिवाय जग हें स्थावरजंगमात्मक आहे. प्राणी मरणशील आहेत; नद्या पर्वत ह्यांस सापेक्षत्वाने मरण नाहीं असें मानतां येईल त्याचप्रमाणें प्राणी अन्नावर जगतात व वाढतात. नद्या डोंगरांना अन्नाची गरज नाहीं. ह्यास्तव कवि सांगतो कीं पुरुष पृथ्वीवरील स्थावरजंगमाचा स्वामी आहे ( ऋ. २ ).

कवीला भूमि दिसत होती तसें आकाशहि त्याच्या दृष्टिपथांत होतें. तें त्यानें वगळलें असतें तर त्याच्या पुरुषाच्या पुरुषत्वाला कमीपणा आला असता. हा विचार मनांत येऊन कवि म्हणतो मी हा **पुरुषाची**








महिमा वर्णन केला त्याच्याहिपेक्षा पुरुष मोठा आहे. जगत् हें केवळ त्या पुरुषाचा एक पाय आहे. अर्थात् एक अंश आहे. तीन अंश अगर त्रिपाद पुरुष स्वर्गांत आहे हा त्रिपाद अमर आहे. आकाशांतील तारे आहेत तसेंच युगेंच्या युगें आहेत म्हणून त्यांच्या ठिकाणीं अमृतत्व आहे. (ऋ. ३). दुसऱ्या मंत्रांतील अमृतत्वाचा अर्थ ओढून ताणून केलेला असें वाटण्यासारखें आहे. प्रथम मंत्रकार खालून वर गेला आता तो उलट दिशेने विवेचन करीत आहे. त्रिपाद पुरुष प्रथम स्वर्गांत प्रकट झाला. आणि (पुनः) त्रिपाद स्वर्ग तर एक पाद जगत्, हा एक पाय ठेवतांच चेतनाचेतनात्मक सर्व जगाला, नानाप्रकारांनी त्यानें व्यापून टाकलें. साशन म्हणजे खाणारे; अनशन म्हणजे जे अन्नावांचून राहतात ते. अर्थात् अचेतन पदार्थांना अन्नाची गरज नसते, दुसऱ्या ऋचेंतील द्वितीय चरण व ह्यामंत्रांतील (ऋ. ४) द्वितीय चरण ह्यांचा एकच अर्थ असला पाहिजे.

पांचवा मंत्र असंबद्ध दिसतो. पूर्वमंत्रांशीं संबंध जोडावयाचा झाला तर असें म्हणतां येईल. द्यावा पृथ्वीच्या निर्मितीचा समवायाने विचार कवीने केला तेव्हां त्याला ह्या संयुक्त सृष्टीचें विराट् स्वरूप दिसलें. तें पुरुषानें उत्पन्न केलें हें स्पष्टच आहे. विराट् म्हणजे रोचमान. विशेषेण राजते तत् विराट्. ह्या विराट् स्वरूपाच्या कारणाने जो फक्त पृथ्वीचा कर्ता पुरुष होता तो आतां अधिपुरुष बनला. अधि व पुरुष हीं दोन पदें आहेत. मी तो एक शब्द समजतों. ह्या अर्थानें दुसऱ्या चरणाचा अर्थ सुलभ झाला आहे असें नाहीं. कारण त्यांत भूमीचाच म्हणजे पृथ्वीचाच संबंध आहे. ह्या चरणाचा अर्थ असा : तो (पुरुष कीं, विराट् पुरुष कीं अधि पुरुष) जन्मतांच त्यानें मागून पुढून अथवा पूर्वपश्चिम दिशांकडून भूमि व्यापून टाकली. ह्यांत नवीन असें कांहींच सांगितलें नाहीं. चौथ्या मंत्रांतील दुसऱ्या चरणाचीच ही द्विरुक्ति दिसते. तस्मात्पेक्षा ततः हा वाजसनेयी संहितेचा पाठ बरा दिसतो. अथर्ववेदांतील पाठ विराडग्रे समभवत् हाच अस्सल पाठ असावा. पुरः म्हणजे पुरस्तात किंवा पूर्वदिशा.

## पुरुषाचें बलिदान व त्यांपासून सृष्टि व पुनः पुरुषोद्भव

सूक्तकाराने आपल्या कल्पनेंतून पुरुष उत्पन्न केला. निर्माता हा संहारकहि होतो. ही कथा पुढील मंत्रांत आहे :

"देवानी यज्ञ केला आणि त्या पुरुषाचें बलिदान केलें. हविष्य म्हणून पुरुषाची आहुति दिली. ह्या यज्ञांत वसंत ऋतु आज्य झाला. ग्रीष्म ऋतूनें समिधांचें कार्य उरकलें आणि शरद् ऋतूचा हवि म्हणून उपयोग करण्यांत आला (ऋ. ६). ह्या यज्ञांत अग्नीचा पत्ता लागत नाहीं. पुरुषाची हवीच्या स्थानीं योजना करून सुद्धा शरद् ऋतूची गरज लागलीच आहे. पुरोडाशादि म्हणून दुसऱ्या हवीची आवश्यकता सिद्ध होत नाही. पशुपुरोडाश शब्द याज्ञिकांना अपरिचित नाहीं. (सृष्टि कोणापासून झाली ह्याचें उत्तर पुरुषापासून झाली असें दिलें.) ह्या ऋचांत यज्ञसंस्थेचा उगम ह्या देवयज्ञांत असल्याचें सांगण्यात आलें आहे. आता सातवी ऋचा पहा–

प्रथम जन्मास आलेल्या पुरुषाचें दर्भासनावर प्रोक्षण करण्यांत आलें. आणि अशा रीतीनें साध्य देव व ऋषी यांनी यज्ञ साजरा केला (यज्ञं अयजन्त ऋ. ७). हा पुरुष विराट् तर नव्हे ? अथर्ववेदांत (मंत्र ९). विराडग्रे समभवत् असा पाठ आहे. तसेंच बर्हिषि प्रौक्षन् ह्याच्या जागीं प्रावृषा प्रौक्षन् असें आहे. ह्यांत प्रोक्षणाला पाणी आहे व आधीची ऋचा विचारांत घेतली तर चारी ऋतूंचा उल्लेख केलेला आहे. ऋग्वेदी मंत्रांत तीन ऋतूंचा फक्त निर्देश आहे. प्रस्तुत ऋग्वेदी मंत्रांत देव आणि ऋषी ह्यांनीं यज्ञ केल्याचें विधान आहे. ह्यांत ऋषयः ह्या शब्दावर आक्षेप घेण्यासारखा आहे. ऋषि आले कोठून ? त्यांची उत्पत्ति आपणांस माहीत नाहीं. ऋषी हे मानव आहेत. उलट पक्षीं देव (तारे) ऋतु व पुरुष हे सर्व अमानव आहेत. ह्यास्तव अथर्ववेदांतील "साध्या वसवश्च ये हा पाठ सयुक्तिक दिसतो. साध्य व वसू हे देवांपैकीं आहेत.

पुढील मंत्रांत यज्ञापासून कोण प्रकट झालें तें सांगितलें आहे. सर्वात्मक जो पुरुष त्याचेंच हवन केल्या कारणाने ह्या यज्ञास सर्वहुत् संबोधण्यांत आलें असावें. ह्या सर्वहुत् यज्ञापासून दहीं, तूप निर्माण











अनुक्रमणिका

झालें. शिवाय तीन प्रकारच्या पशूंची उत्पत्ति झाली. ह्या तीन जाती म्हणजे वायुदेवतात्मक, अरण्यवासी व ग्रामवासी ( ऋ. १ ) " अन्तरिक्षदेवत्याः खलु वै पशवः " आणि " वायुर्वा अन्तरिक्षस्याध्यक्षाः " असें तैत्तिरीय ब्राह्मणकार प्रतिपादतात. वायव्यान् शब्द येथेच आला आहे. सर्वच पशूंची देवता वायु आहे असें मानलें तर पशूंच्या दोनच जाती राहतील ( १ ) जंगलांतील व ( २ ) लोकवस्तींतील. पशु शब्दांत पक्ष्यांचा समावेश होईल काय ? पक्ष्यांना कां गाळलें ? पक्ष्यांना वायव्यान् म्हणजे अन्तरिक्षांत संचार करणारे असें म्हणतां येईल.

ह्या सर्वहुत् यज्ञापासून ऋक्, साम, यजु आणि छंद उत्पन्न झाले ( ऋचा ९ ).

त्याच यज्ञापासून घोडे, दोनहि जबड्यांत दांत असलेले प्राणी, गाई व शेळ्या-मेंढ्या ह्यांची उत्पत्ति झाली. ( ऋचा १० ). ८ व्या मन्त्रांतील पशूंचें हें स्पष्टीकरण कीं काय ? का द्विरुक्ति समजावयाची ?

यज्ञापासून झालेल्या सृष्टीचें हें वर्णन झालें. आतां पुरुषसृष्टीचे वर्णन पुढील ऋचांत केलें आहे.

जेव्हां **पुरुष** निर्माण केला तेव्हां त्याची विभागणी कशी केली, त्याचें मुख कोणतें; बाहू कोणते त्याच्या मांड्या कोणत्या, कोणत्या भागाला पाय म्हणतात ? ( ऋचा ११ ). ह्या सूक्ताची शब्दरचना गबाळी आहे. पुरुषाला निर्माण कोणीं व केव्हा केलें ? हा पुरुष कोण ? सायणाचार्य ऋग्वेद भाष्यांत म्हणतात–"यदा प्रजापतेः प्राणरूपादेवाः पुरुषं विराट्रूपं व्यदधुः " परंतु ह्याला आधार काय ? " तस्मात् विराट् अजायत " हे शब्द आहेत ( ऋ. ५ ). येथे तस्मात् म्हणजे आदि-पुरुषात् असें स्वतः सायणाचार्य म्हणतात. विराट् अजायत म्हणजे विराट् ( **पुरुष ?** ) उत्पन्न झाला. त्याला संकल्पपूर्वक कोणीं निर्माण केला नाहीं. ह्याच्या उलट अथर्ववेदाच्या भाष्यांत सायणाचार्य म्हणतात, 'यत्पुरुषेण हविषा देवा यज्ञं अतन्वत तं पुरुषं निमित्ती-कृत्य " इत्यादि. तथापि ह्या पुरुषाला तरी उत्पन्न कोणीं केलें ? एवढें मात्र खरें कीं, ऋग्वेदभाष्यापेक्षा अथर्वभाष्य अधिक सयुक्तिक दिसतें. प्रस्तुत ऋचें-तील पुरुष हा यज्ञपुरुष म्हणजे यज्ञहवि मानणें एकंदरींत बरें दिसतें. यज्ञपशूचे निरनिराळे अवयव ऋत्विक्, यजमान, यजमानपत्नी ह्यांनी भक्षण करावयाचे असतात. ह्यासाठीं तर हा प्रश्न विचारण्यांत आला नसेल ? असो.

वरील प्रश्नाचें उत्तर पुढील ऋचेंत दिलें आहे.

ब्राह्मण हें ह्याचें मुख; राजन्या–( क्षत्रिय ? ) ला बाहू केलें; जो वैश्य तो त्याच्या मांड्या बनला; पायांतून शूद्र निपजला ( ऋचा १२ ). शूद्र हे पुरुषाचे पाय होत असें न म्हणतां पायांपासून शूद्र निपजला असें म्हणण्यांत भाषेचा बारकावा आढळत नाहीं. यज्ञ-पुरुषाचें मुख कोणतें ह्या प्रश्नाचें उत्तर ब्राह्मण हें त्याचें मुख असें आहे. ह्यांतून ब्राह्मण पुरुषाच्या मुखापासून प्रथमच जन्मास आले असा अर्थ काढणें कसें सयुक्तिक होईल समजत नाहीं.

( **पुरुषाच्या** ) मनानें चन्द्राला जन्म दिला; चक्षूं-तून सूर्य उपजला. मुखांतून इंद्र व अग्नि आणि प्राणां-पासून वायु ह्यांची उत्पत्ति झाली ( ऋचा १३ ).

ब्राह्मण हे पुरुषाच्या मुखांतून निपजले असें म्हटलें तर ब्राह्मणाच्या जोडीला ह्या मंत्रांत इन्द्र व अग्नि ह्यांना बसविलें आहे. तिघांचें उगमस्थान **पुरुषाचें** मुख.

नाभींतून अन्तरिक्ष निघालें; मस्तकांतून द्यौ; पायां-पासून भूमि; कर्णांपासून दिशा ह्याप्रमाणे लोक बनवि-ण्यांत आले. ( ऋचा १४ ).

पायांपासून शूद्र व भूमि, नुसते कल्पना तरंग ! यज्ञ करणाऱ्या देवांनीं जेव्हां पुरुषपशूला ( यूपाशी ) बांधलें तेव्हां त्या यज्ञाला सात परिघी **व एकवीस** समिधा केलेल्या होत्या ( ऋचा १५ ).

पूर्वी ( ऋ. ६ ) ग्रीष्मऋतूनें इध्म्याची जागा घेतली होती. येथे एकवीस समिधा केल्या होत्या असें सांग-तात. हें एकाच यज्ञाचें वर्णन ! परिधींचा उल्लेख मागे नव्हता, नव्यानेच येथे दिसतो. परिधि म्हणजे हात-भर लांबीची यज्ञिय वृक्षाची डहाळी ( काणे ) ह्या अग्नीच्या सभोंवार ठेवतात. येथे– देव यज्ञांत सात परिधी म्हणजे सात छंद ( वृत्तें ) : गायत्री, त्रिष्टुभ्, अनुष्टुभ् इत्यादि सात प्रमुख छंद. ऋग्वेदांतील वृत्तें सातांहून अधिक आहेत. समिधा काष्ठमय नव्हत्या. बारा मास, पांच ऋतु, तीन लोक व एक आदित्य ह्या एकवीस समिधा होत ( ऐ. ब्रा. १–३० ह्यांत असा निर्देश आहे. हाच उल्लेख तै. सं. ५–१–१०–३ मध्ये आहे ).








अखेरची ऋचा समारोपात्मक आहे.

यज्ञ करून यज्ञाला ( यज्ञपुरुषाला ) देवांनीं संतुष्ट केलें. हींच पहिलीं कर्मे–कर्तव्यें होत. असें करण्यानें थोर पुरुष जेथे पूर्वी साध्यदेव राहतात त्या स्वर्गाला प्राप्त करून घेतात ( ऋचा. १६ ). हीच ऋचा ऋग्वेदांत १।१६४।५० म्हणून आली आहे.

साध्यदेव इन्द्रादिदेवांच्या पूर्वीचे असें दिसतें. यज्ञकर्म हेंच प्रथमपासून माणसांचें कर्तव्य ठरलें. येथे पुरुषसूक्त समाप्त झालें.

ह्या सूक्तांत सृष्ट्युत्पत्तीचें कार्य वर्णिलें आहे. शिवाय एवढें मोठें कार्य करतांना बळी द्यावा लागतो ही कल्पना आहे. बळी यज्ञांत द्यावयाचा असतो. म्हणून यज्ञ सांगावा लागला. तळें खणावयाचें म्हणजे बळी द्यावा लागतो ही समजूत आजहि प्रचलित आहे. घर बांधलें कीं यजमान मरतो असा समज आहे. कांहीं प्राण्यांत प्रजोत्पादन होतांच आई मरते असें म्हणतात. येथे देवानें सृष्टि निर्माण केली आणि देवच नष्ट होत आहे !

## पुरुषसूक्तांतील चातुर्वर्ण्य

पुरुषसूक्तांतील ब्राह्मण, राजन्य, वैश्य व शूद्र ह्या शब्दांवरून ऋग्वेदकालीं चातुर्वर्ण्य प्रस्थापित झालें होतें असें मानण्याकडे प्रवृत्ति होते. अनेक विद्वानांनी तसें प्रतिपादिलेंहि आहे. शूद्र शब्दामुळें हे चार शब्द वर्णवाचक आहेत असें मानतां येईल हें खरें. तथापि हें चातुर्वर्ण्य ऋग्वेदकालीन आहे काय हाच खरा प्रश्न आहे. आतां, सूक्त जर ऋग्वेदांत आहे तर चारवर्ण ऋग्वेदकालीं होते असें म्हणण्यास काय हरकत आहे, असा प्रश्न कोणीहि विचारील. माझ्या मतें ऋग्वेदसंहितेंत ह्या सूक्ताचा अन्तर्भाव केलेला असला तरी तें खास ऋग्वेदी घाटाचें नाहीं, ह्याला कारणें अशीं– ब्राह्मण शब्दाचा अर्थ ऋग्वेदांत जातिविशिष्ट होत नाहीं. ब्राह्मण शब्द ज्या ज्या ऋचांत आढळला त्या सर्व एकत्र करून त्याचा अर्थ ब्रह्म ( स्तोत्र ) कृण्वन्ति –स्तोत्र रचणारे ते ब्राह्मण असा मी केला आहे. स्तोत्रें रचणारांत स्त्रिया आहेत, क्षत्रियहि आहेत. दुसरी गोष्ट लक्षांत घ्यावयाची ती ही कीं, राजन्य, वैश्य व शूद्र हे शब्द अन्यत्र सांपडत नाहींत; फक्त ह्याच सूक्तांत आहेत. क्षत्रिय शब्द ऋग्वेदांत अनेक वेळां वापरलेला असून येथेंच राजन्य शब्द उपयोजण्यांत कां यावा ह्याचा विचार करणें अवश्य आहे. तसेंच ऋग्वेदांत विश शब्दाची रेलचेल आहे. पण वैश्य शब्द कोठेहि नाहीं. शूद्र तर नाहींच नाहीं. बाकीच्या वेदांत व ब्राह्मण ग्रंथांत ह्या शब्दांचें वैपुल्य आढळतें. ह्यावरून संहिताकालीं हें शब्द वर्ण ह्या अर्थी प्रचलित होते असें म्हणणें प्राप्त आहे. परंतु संहिताकाल व ऋक्‌रचनाकाल ह्यांत कालाचें अंतर मानावयास नको काय ?

## पुरुषसूक्ताचे पाठभेद

पुरुषसूक्त ऋग्वेदांतच आहे असें नाहीं. तैत्तिरीय ब्राह्मण, वाजसनीय संहिता व अथर्ववेद ह्यांतहि तें पाठभेदानें आढळतें. त्यांतल्यात्यांत तैत्तिरीय सूक्ताशीं ऋग्वेदी सूक्ताचें बरेंच साम्य आहे.

पुरुषसूक्तांतच आढळणाऱ्या शब्दांचा भरणा थोडा थोडका नाही ही गोष्ट ह्या निर्णयाच्या कामीं विचारांत घेणें उपयुक्त होईल. असे शब्द – ग्रीष्म, वायव्यान्, उभयादतः, आरण्यान्, अतिरोहति, सहस्रशीर्षा, दशांगुलम्, साशनानशने, सर्वहुतः, राजन्य, वैश्य व शूद्र. ह्यावरून ह्या सूक्ताचा निराळेपणा दिसून येईल. एका सूक्तांत इतके शब्द आहेत हें ध्यानांत ठेवावें.

आतां पाठभेदांचा विचार करूं. भव्यम् व अभवत् हे ऋग्वेदी शब्द माध्यंदिनांच्या व तैत्तिरीयांच्या ग्रंथांत भाव्यम् व अभवात् असे लिहिले आहेत. बारीकसारीक भेदांकडे दुर्लक्ष करून लक्ष्यवेधक भेदांचा येथें निर्देश करतों. 'सहस्रशीर्षा' च्या ऐवजी सहस्रबाहुः ( अथर्व ); अन्नेनातिरोहति = अन्येनाभवत् सह ( अथर्व ); त्रिपात् ऊर्ध्व उदैत् = त्रिभिः पद्भिर्द्या मरोहत् ( अथर्व ). उदैत् आणि अरोहत् हा फरक अर्थ बदलणारा आहे. बर्हिषि = प्रावृषा; ऋषयः = वसवः (अथर्व). मुखादिन्द्रश्चाग्निश्च प्राणाद्वायुरजायत = श्रोत्राद्वायुश्च प्राणश्च मुखादग्निरजायत ( वाजसनेयीसं ). ऋक् १६ व्या मंत्राच्या जागीं अथर्ववेदांत पुढील मंत्र आहे —

> मूर्ध्नो देवस्य बृहतो अंशवः सप्तसप्ततीः
> राज्ञः सोमस्याजायन्त जातस्य पुरुषादधि ॥

ह्याचा अर्थ असा–

पुरुषापासून जन्मलेले सोमराजाचे एकशें चाळीस किरण महान् देवाच्या मस्तकापासून उत्पन्न झाले.

हा अगदी नवीन मंत्र आहे. त्यांत सोमाची स्तुति आहे. हा मंत्र तै. ब्राह्मणांत अथवा वाजसनेयी संहितेंत



अनुक्रमणिका






नाहीं. माझा तर्क असा धावतो कीं, मूळ कल्पना फार प्राचीन असून सर्वतोमुखी असावी. पाठभेदाचें हें कारण संभवतें. ह्या तर्काला आणखी पोषक प्रमाण म्हणजे सर्व ठिकाणीं एकाच क्रमानें मंत्र नसणें हें होय.

मंत्रांचा क्रम *

| ऋ. | वा. | अथर्व | तैत्तिरीय अरण |
|---|---|---|---|
| १ | १ | १ | १ |
| २ | २ | ४ | २ |
| ३ | ३ | ३ | ३ |
| ४ | ४ | २ | ४ |
| ५ | ५ | ९ | ५ |
| ६ | १४ | १० | ६ |
| ७ | ९ | ११ | ८ |
| ८ | ६ | १४ | ९ |
| ९ | ७ | १३ | १० |
| १० | ८ | १२ | ११ |
| ११ | १० | ५ | १२ |
| १२ | ११ | ६ | १३ |
| १३ | १२ | ७ | १४ |
| १४ | १३ | ८ | १५ |
| १५ | १५ | १५ | ७ |
| १६ | १६ | १६ | १८ |

– निराळा मंत्र

## पुरुषसूक्त पठन स्नानकाली

स्नानाच्या वेळीं पुरुषसूक्त म्हणण्याचा परिपाठ आहे. बरोबर बोलावयाचें म्हणजे स्नान करितांना जे मंत्र म्हणतात त्यांना पुरुषसूक्त ही लौकिक संज्ञा आहे. ह्याला अभिषेक सूक्त म्हणतां येईल. हें सूक्त ऋग्वेद १०–९०; १–१२–१६ ते २१; आणि ऐ. ब्रा. ८–३७–३ असें मिळून बनविलें आहे. ह्याचा कर्ता कोण व ही रचना अथवा जुळणी केव्हा केली हें सांगणें कठीण आहे. ब्रह्मकर्माच्या पोथ्या जुन्यांत जुन्या किती आहेत ह्याचा शोध अद्यापि कोणीं केला नाहीं. स्नानाच्या वेळीं आम्ही हें जाडें सूक्त म्हणतों खरें परंतु स्नानविधींत तें दिलेलें नाहीं. पूजा विधि तयार करणारांनी पुरुषसूक्ताचा उपयोग केला असल्यामुळें तेथे तें येतें. देवपूजेंत विष्णूवर अभिषेक ह्या बनविलेल्या सूक्ताने होतो. स्नानाच्या वेळीं आपण पुरुषच आहों असें समजून हें सूक्त म्हणण्याचा प्रघात पडला असावा. नदींतील स्नान बंद पडल्यावर ही योजना करण्यांत आली असल्याचा संभव आहे. सध्या आपण संध्येंत मार्जन करितों तें मस्तकावर व्हावें असें म. म. काणे लिहितात. हें विधान अर्घ्यदानापर्यंतची संध्या नदींत होत असे असें सुचविते. ह्या कल्पनेला स्नानसंध्या हा संयुक्त शब्द पोषक आहे. खेरीज अर्घ्यदानानंतर 'द्विराचम्य' असा आदेश आहे. कर्मान्ते द्विराचमनम् ह्या नियमाला अनुसरून आपण दोनदा आचमन करितों. ह्यावरूनहि येथें संध्या संपली हेंच सिद्ध होतें.

## पुरुषसूक्ताची पंडितांनी केलेली विविध मीमांसा

पुरुषसूक्तावर पाश्चात्यांनी जितके परिश्रम केले आहेत त्यांच्या शतांशानेहि आम्हीं केले नाहींत. आमच्यापैकीं, करमरकर व ताडपत्रीकर ह्यांचेंच पुरुषसूक्ताकडे लक्ष गेलेलें दिसतें. ताडपत्रीकरांच्या विवेचनांत प्रमाणशीलता नसली तरी अपूर्वता खास आहे. त्यांच्या मतें सैन्यांतील पुरुषव्यूहाचें वर्णन पुरुष सूक्तांत केलेलें आहे. आर्य लढवय्ये होते. त्यांनी ही व्यूहरचना कल्पिली. महाभारतकालीं कांहीं ती प्रथमच उद्भवली नाहीं. श्येनव्यूहांत श्येन पक्षाच्या आकाराची सैन्यरचना करीत, तसा प्रस्तुत सूक्तांत पुरुषाच्या आकाराचा व्यूह वर्णिला आहे. ब्राह्मण हे आघाडीवर ठेवावयाचे, क्षत्रिय त्यांच्या बाजूला. प्रत्येक ब्राह्मण सैनिकाच्या उजव्या हाताला एक क्षत्रिय उभा. वैश्य-शूद्र कोठे असावयाचे हें सांगण्याच्या भरीस ते पडले नाहींत. तात्पर्य पुरुष सूक्तांत सृष्ट्युत्पत्ति नाहीं व देवाधिदेवहि नाहीं. सैन्य-रचना आहे !

करमरकरांचा तर्क असा कीं ह्या सूक्तांत मनुष्य मेधाचा कूटात्मक गौरव केलेला आहे. सृष्टि देवांच्या द्वारा निर्माण झाली. हें सृष्टि निर्मितीचें कार्य म्हणजेच यज्ञ. ह्या यज्ञांत पुरुषाचा बळी दिला. आणि त्याच्या ( कोणाच्या ? यज्ञाच्या कीं बळी दिलेल्याच्या ? ) शरिरांतून चार जाती जन्म पावल्या हें राधाकृष्णांचें मत

* पुरुषसूक्ताचा निर्देश : ऋग्वेद १०।९०; वाजसनेयी ३१ अध्याय; अथर्ववेद काण्ड १९ सूक्त ६० तैत्तिरीय अरण ३–१२.








करमरकरांनीं उद्‌धृत केलें आहे. पुरुषाबरोबर साध्य देव व ऋषी ह्यांच्या आहुती देण्यांत आल्या असें करमरकरांचें म्हणणें दिसतें. पुरुषाला बळी देणें हा प्राचीन धर्म होता ( तानि धर्माणि प्रथमान्यासन् ); तथापि त्यांच्या मतें मनुष्याचा बली देणें ही अनार्यांची रीत असून आर्य तिच्या विरुद्ध होते हें शुनःशेपाच्या कथेवरून अनुमानितां येतें. पुरुषमेधाची कांहींशी विस्तृत हकीकत वाजसनेयी संहितेंत आहेच ( अ० ३० ). पुरुषमेध हें ह्या यज्ञाचें नांव असलें तरी स्त्रीलाहि बळी देत. ह्या अध्यायाच्या शेवटीं म्हटलें आहे-मगध देशांत जन्मलेला माणूस, व्यभिचारिणी स्त्री, जुगार खेळणारा मनुष्य व एक नपुंसक माणूस हे चार मनुष्य पशु दुसऱ्या यूपस्तंभाला बांधावेत. अथर्ववेदांत ( काण्ड १५ ) व्रात्यावर संस्कार करून त्याला श्रेष्ठ केल्याचा उल्लेख आहे. करमरकर म्हणतात हे व्रात्य द्रवीड होते. पुरुष-सूक्तांत सात परिधि व एकवीस समिधांचा उल्लेख आहे हा साताचा आंकडा अत्यंत सूचक व महत्त्वाचा आहे असें करमरकरांना वाटतें. ह्याला ते प्रमाण असें देतात कीं, मोहेंजोदारो उत्खननांत सात माणसांचा बळी देत आहेत असें दाखविलें आहे. अथर्ववेदांत रुद्राला सात बळी दिल्याचा उल्लेख आहे असें सांगून ते पुढें म्हणतात : "दक्षिण हिंदुस्थानांत कबरीखाली सात माणसें असलेलीं आढळलीं." ह्यानंतर हिराडटसच्या इतिहासांतील एक उदाहरण त्यांनीं दिलें आहे. लिडिअन लोकांच्या राजाला त्याच्या चौदा कैद्यांसह जळत्या चितेवर टाकून दिलें. परशुरामानें चित्पावनांचीं चौदा प्रेतें चितेंतून काढलीं हेंहि सांगण्यास ते विसरले नाहींत. ब्रह्मांडपुराणावरून असें दिसतें कीं ललितादेवीच्या गळ्यांत सात असुरांच्या कवट्यांची माळ होती हें आणखी एक प्रमाण त्यांनीं आपल्या मताला पोषक म्हणून दिलें आहे.

श्री. करमरकर ह्यांचें संशोधन परिश्रमपूर्वक केलेलें आहे. ७, १४, २१, २८ इ. आंकडे सूचक आहेत असें ते म्हणतात. पुरुषसूक्तांत पुरुषांला बळी दिला हें स्पष्ट आहे. परंतु सात परिधि व एकवीस समिधा ह्यावरून इतके बली दिल्याचें अनुमान काढणें कठीण आहे. वाजसनेयी संहितेवरून पुष्कळच माणसें यूपाला बांधल्याचें दिसतें.

नॉर्मन ब्राऊनच्या मतानें पुरुष हा अग्नि, सूर्य व विष्णु ह्यांच्या मिश्रणानें बनविला आहे. सूक्तांतील त्रिपाद, विक्रमे, अतिरोहति, अमृतत्व इ. शब्द ऋग्वेदांत इतरत्र आले आहेत तेथें त्यांचा अर्थ काय होतो हें पाहून त्यावरून निघणाऱ्या अनुमानानें त्यानें आपल्या मताचें समर्थन केलें आहे. तथापि पुरुषसूक्त ऋग्वेद बाह्य आहे असें सिद्ध झाल्यास त्याचे हे श्रम निष्फळ होणार आहेत. त्याचा एक मुद्दा विचारांत घेण्यासारखा आहे. तो म्हणतो, पुरुषसूक्त पुरुष म्हणून एक व्यक्ति रंगवीत नाहीं तर त्याचें विश्वव्यापकत्व व यज्ञधर्म म्हणून आचरणें ह्यांच्यावर पुरुषसूक्ताचा भर आहे. ह्याच्या योगानें पुरुषमेधाची कल्पनाच खिळखिळी पडते.

शायरचें विवरण पुरुषसूक्तांतील सृष्ट्युत्पत्ती पुरतेंच आहे. त्यानें असें दाखविलें आहे कीं विश्वोत्पत्तीचे हे विचार भारतांतच प्रचलित होते असें नाहीं. इराण,










ग्रीस, जर्मनी, रशिया ह्या देशांतहि ह्यासारखेच विचार लोकांना सुचले होते. त्यापैकीं, एका जुन्या रशियन गीतांतील कल्पनांचें पुरुषसूक्तांतील कल्पनांशीं असलेलें साम्य त्याने दाखविलें आहे. थोडक्यांत त्यांतील गोष्ट अशी : आकाशांतून एक पुस्तक पडलें, त्यांत जगाची उत्पत्ति सांगितलेली होती. सर्व राजे, उप-राजे तेथें धांवून आले. त्यांनीं झार डेव्हिडला वाचून दाखविण्याची विनंती केली. पण झारला वाचतां येईना. त्याचे डोळे दिपून गेले. तो म्हणाला, माझ्या शरिरांत पवित्र आत्म्याचा ( Holly Ghost ) संचार झाला आहे. तुम्ही प्रश्न विचारा, मी उत्तरें देतों. जगाच्या उत्पत्ति संबंधानेंहि प्रश्नोत्तरें होतीं. डेव्हीड म्हणाला हें धवल जग ( white world ) परमेश्वरा-( Lord ) पासून उगवलें. परमेश्वराच्या मुखापासून तांबडा सूर्य; त्याच्या हृदयापासून चन्द्र; नेत्रांतून उषा; त्याच्या वस्त्रांतून आकाशांतील तारकापुंज पुण्यात्म्या-( Holly Ghost ) पासून वायु; आणि ॲडम पासून प्रजा ह्याप्रमाणें उत्पत्ति झाली. त्याच्यापुढें दगडांपासून हाडें व दमट मातीपासून शरीरें उद्भवल्याचें वर्णन आहे. स्कॅन्होनिक भाषेंतील कांहीं ग्रंथांत ॲडमच्या मस्तकांतून झार राजे व जानूपासून शेतकरी उपजल्याचें वर्णन आहे. तें पुरुषसूक्तांतील वर्णनाशीं कांहींसें जुळतें आहे असें ह्या लेखकाचें म्हणणें आहे.

ह्याखेरीज स. १९३३ सालीं सर्वधर्मसमन्वयाश्रमाने द्विजदासदत्त ह्यांचा एक ह्या विषयावरील लेख प्रसिद्ध केला आहे. त्याचप्रमाणें श्री गंगाप्रसाद ह्यांनींहि पुरुषसूक्तावर लिहिलें आहे. हे लेख मला वाचावयास मिळाले नाहींत.

## प्रस्तुत लेखकाची मीमांसा

ऋग्वेदांतील ब्राह्मण शब्दाचा अर्थ ठरवीत असतांना प्रस्तुत सूक्तांतील ब्राह्मण शब्द मला नडला. इतरत्र मंत्रकार म्हणजे ब्राह्मण ह्या अर्थानेच ब्राह्मण शब्द ऋग्वेदांत वापरल्याचें आढळलें. परंतु पुरुषसूक्तांतील ब्राह्मण शब्द राजन्य, वैश्य व शूद्र ह्या शब्दांच्या संदर्भात वर्णवाचक आहे असें मानणें चुकीचें होणार नाहीं असें वाटलें. तेव्हां सगळया ऋग्वेदांत एकाच ठिकाणीं निराळया अर्थानें हा शब्द वापरण्यांत कां यावा हें कोडें पडलें. सारांश, वर्णविचार प्रसृत झाल्यानंतरची ही सूत्ररचना व मंत्रनिर्मिति आहे असा तर्क करणें अनुचित नाहीं. सूक्त पुरुषाला नारायण संज्ञा दिली आहे. ही गोष्टहि सूक्ताचें ऋग्वेदकालोत्तरत्व दर्शवितें. सायणाचार्य म्हणतात, वाजसनेयक ब्राह्मणांत म्हटलें आहे कीं,— ‘ पुरुषोह वै नारायणो कामयत अति तिष्ठेयं सर्वाणि भूतानि अहमेवेदं सर्वं स्याम् इति !’ नारायण कल्पना ही उत्तरकालीन आहे. ( प्रस्तावना अथर्ववेद काण्ड १९ मधीले सहाव्या सूक्ताची). कांहीं कल्पना अत्यंत प्राचीन व कांहीं पाठीमागच्या अशांचा हा कल्पना अथवा विचारसंकर ह्या सूक्तांत आहे. पुरुषमेध व यज्ञसंस्था ह्या कल्पना प्राचीन असाव्या. तसेंच सृष्ट्युत्पत्ति विषयक विचारहि प्राचीन कालीन समजण्यास हरकत नाहीं. येथें हें लक्षांत ठेवणें अवश्य आहे कीं, बायबलांत ईश्वराने जग निर्माण केलें असें आहे. ह्यांत ईश्वराचें अस्तित्व गृहित धरलें आहे. ह्यांत ईश्वराचा शोध नाहीं; जगाचा आहे. उलटपक्षीं पुरुष सूक्तकार ईश्वराचा शोध करूं इच्छितो. सर्व विश्व त्याला प्रत्यक्ष दिसतच होतें. म्हणून त्याने हें अखिल विश्व हाच ईश्वर असें ठरविलें आणि तें ठरवितां ठरवितां ईश्वराच्या अनंताची कल्पना त्याला सुचली. जगत् व ईश्वर ह्यांचें पूर्ण तादात्म्य.

देवाचा शोध व यज्ञ संस्थेची उत्पत्ति ह्यांचें सूक्तांत मिश्रण असल्यामुळें पुरुषसूक्ताचा द्विविध अर्थ करण्यांत येतो. ‘ आधियाज्ञिकः एकः आध्यात्मिकोपरः’ हे सांप्रदायिक अर्थ झाले. ह्यानंतर प्रत्येक अभ्यासू आपआपल्या बुद्धीप्रमाणें अर्थ लावील तो निराळाच.

पुरुषसूक्त ऋग्वेद, दोनहि यजुवद व अथर्ववेद ह्यांत निरनिराळया भेदभावाने आढळतें हें वर आलेंच आहे. तथापि, ह्या फरकावरून अनेक गोष्टी लक्षांत येण्यासारख्या आहेत. ऋग्वदी पुरुष सूक्ताचे १६ मंत्र आहेत तर तैत्तिरियांचे १८ आहेत. दोन अधिक आहेत ते असे —

( १ ) वेदाहमेतं पुरुषं महान्तं  
आदित्यवर्णं तमसस्तुपारे ।  
सर्वाणिरूपाणि विचित्यधीरः  
नामानिकृत्वाभिवदन्यदास्ते ॥

( २ ) धाता पुरस्ताद्यमुदाजहार  
शक्रः प्रविद्वान् प्रतिशश्चतस्रः ।








तमेवं विद्वानमृत इह भवति
नान्यः पंथा अयनाय विद्यते ॥

ह्यांत देवाची कल्पना सूर्यावर आधारलेली दिसते. पहिला मंत्र व दुसऱ्याचा दुसरा चरण मिळून बनलेला मंत्र वाजसनेयि संहितेत आहे तो असा —

वेदाहमेतं पुरुषंमहान्तमादित्यवर्णं तमसः परस्तात्
तमेव विदित्वातिमृत्युमेति नान्यः पन्था विद्यतेऽयनाय ॥

हा आत्मोद्धाराचा उपाय वरील मंत्रांत सांगितला आहे. अर्थात् निरनिराळया विसदृश कल्पनांचें मिश्रण झालेलें आहे, ह्यावरून स्पष्ट दिसतें कीं निरनिराळया कल्पना कोठेतरी व कशातरी तरंगत होत्या. त्या वेगवेगळया वेदव्यासांनी पुरा विचार न करितां आपआपल्या मतीप्रमाणें आपल्या वेदांत गोवून टाकल्या. मला असा संशय येतो कीं, ऋग्वेदीय पुरुषसूक्तांतील ऋचा ११, १२, १३, १४ ह्यांचा एक स्वतंत्र गट असावा. पांगलेले तुकडे निष्काळजीने एकत्र केले असावे ह्याचा अर्थ संहितेच्या अगर संहितांच्या बाहेर बहुसंख्य वेदमंत्र होते असा होतो.

ऋग्वेदाचा अभिमान बाळगून पुरुषसूक्ताचा अर्थ लावला तर मंत्र रचणारे जे ब्राह्मण ते ह्या पुरुषाचें मुख; यज्ञप्रसंगी गाडाभर द्रव्यदान करणारे जे राजन्य ते पुरुषाचे बाहू; यज्ञ करणारे यजमान गृहस्थ (वैश्य) त्या त्याच्या मांड्या. पण शूद्राचें काय? त्याचा अर्थ करण्याला साधन नाहीं. तेव्हां शूद्र नांवाचे कोणी तरी पुरुषाचे पाय असें माझ्या मताने समजलें पाहिजे. विश् शब्दाचा अर्थ मी ऋत्विजांच्या साहाय्याने स्वतःच्या घरांत यज्ञ करणारा तो विश् असा केला आहे. ब्राह्मण आणि विश् हे माझे लेख अद्यापि प्रसिद्ध झाले नाहींत.

---





अनुक्रमणिका






प्रा. र. चिं. वडवे

# म. गांधींच्या कार्याचें मूल्यमापन

लोकमान्य टिळकांच्या मृत्यूपासून स्वातंत्र्यप्राप्ती-पर्यंतच्या कालखंडांतील भारतीय सार्वजनिक जीव-नांत महात्मा गांधीचें स्थान अद्वितीय व सर्वोच्च असल्यानें त्यांचें जीवनकार्य व तत्वज्ञान याविषयीं उलट सुलट चर्चा व मूल्यमापन त्यांच्या सर्व हया-तींत व तदनंतरहि मोठ्या प्रमाणावर चालूं होतें व अनेक ल्हानथोर मंडळींनीं त्यांत आपापल्या परीनें भाग घेतला होता. महाराष्ट्रानें तर या बाबतींत बुद्धिवादाच्या आश्रयानें उच्चांक गांठला होता असें म्हणतां येईल. प्रत्येक टीकाकाराला स्वतःचा म्हणून कांहीं अनुकूल वा प्रतिकूल असा दृष्टिकोन असतो व यामुळें निरनिराळ्या टीकाकारांनीं एकाच व्यक्तीच्या कार्यासंबंधीं केलेल्या मूल्यमापनांत दक्षिण व उत्तर ध्रुवांइतकें अंतर पडलेलें पहावयास सिळतें. कांहीं टीकाकारांची मजल म. गांधींची गणना अवतारी पुरुषांत करण्याइतकी जाते तर कांहीं त्यांना राष्ट्र-पित्याच्या पदवीप्रत नेऊन पोंचवितात व त्यांच्या सत्य अहिंसेच्या मंत्रानेंच राष्ट्रीय स्वातंत्र्याचें स्वप्न साकार झालें असें आग्रहानें व क्वचित् अट्टाहासानें प्रतिपादतात. या उलट कांहीं टीकाकारांचें मत असें दिसतें कीं म. गांधींच्या चुकीच्या, पडखाऊ व ' घरच्याच म्हातारीचे काळ ' यासारख्या देश-घातक धोरणामुळेंच या प्राचीन देशाचीं शकलें झालीं व स्वातंत्र्याला मोठें आणि कदाचित् कधींहि पुसलें न जाणारें असें गालबोट लागलें. तटस्थ व निर्विकार मनानें विचार केल्यास असें सहज दिसून येईल कीं अशा प्रकारच्या प्रत्येक मूल्यमापनांत थोडा-फार सत्यांश व थोडीफार अतिशयोक्ति असते व यामुळें त्याकडे नीरक्षीर न्यायानेंच पहावयाचें असतें. परंतु म. गांधीसंबंधीच्या मूल्यमापनाची दुसरीहि एक महत्त्वाची बाजू विचारांत घेणें अवश्य आहे. जगांतील पहिल्या प्रतीचीं थोर माणसें हीं कोण-त्याना कोणत्या देशांतच जन्माला येत असल्यानें त्यांचें कार्यक्षेत्रहि पुष्कळवेळा त्या त्या देशापुरतें परिसीमित होणें अपरिहार्य असतें. या कार्यामुळें त्यांना जो काय मोठेपणा प्राप्त होतो तो योग्यच होय.

## राष्ट्रीयतेतून मानवतेकडे

परंतु अनेक वेळां असें घडतें कीं देशकालपरि-स्थितीमुळेंच केवळ मर्यादित वाटणाऱ्या या कार्यांत अखिल मानवजातीच्या भवितव्यतेच्या व कल्या-णाच्या दृष्टीनें अत्यंत मूल्यवान् व शाश्वत स्वरूपाचे असे सिद्धान्त अनुस्यूत असतात व त्या सिद्धान्तांतच त्या व्यक्तीचें दिक्कालातीत असें थोरपण असतें. राष्ट्रीय-त्वाच्या या काळांत राष्ट्रवादाच्या परिमित दृष्टिकोनां-तूनच सर्व राष्ट्रीय वा आंतरराष्ट्रीय घटनांकडे पहा-ण्याची व त्याचा अर्थ लावण्याची स्वाभाविक प्रवृत्ति सर्वसाधारण जनतेंत व नेत्यांतहि प्रभावी असल्यानें हे शाश्वत सिद्धान्त तत्संबंधीची जाणीव असूनहि सहजासहजीं नजरेंत भरत नाहींत व त्यामुळें ते उपे-क्षिले जाण्याचाहि संभव असतो. असें होऊं न देणें व हे सिद्धान्त पुन्हां पुन्हां जनतेपुढें आणून तिच्या-वर त्यांचे योग्य असे संस्कार घडवून आणण्याचा क्रम चालूं ठेवणें हें समाजांतील विचारवंतांचें काम आहे. गांधीजयंतीच्या निमित्तानें असा एक प्रयत्न करणें हें या लेखाचें प्रयोजन आहे.

मानवजातीच्या हिताच्या दृष्टीनें म. गांधींच्या कार्याचें महत्त्व कोणतें हें नीट आकलन होण्यासाठीं






ते ज्या युगांत जन्मले, वाढले व परिस्थितीच्या ज्या पार्श्वभूमीवर कार्य करण्यांत त्यांनीं आपली सर्व हयात वेंचली तिचें तपशिलवार ज्ञान प्राप्त करून घेणें अगत्याचें असल्यानें त्याकडे प्रथम वळूं. ही माहिती अर्थांतच जगाच्या परिस्थितीसंबंधी हवी; केवळ भारतांतील परिस्थितीचा नव्हे. भारतांतील परिस्थिती हा जगांतील परिस्थितीचाच एक भाग अथवा दाखला असल्यानें त्यासंबंधीं स्वतंत्र विवेचनाची गरज नाहीं. अशा व्यापक दृष्टीनें विचार केल्यास कोणासहि लक्षांत येईल कीं म. गांधींचें कार्य हें विज्ञान युगांतील कार्य होय. विज्ञानाचा गेल्या शेदीडशें वर्षांचा इतिहास पाहिल्यास असें दिसून येईल कीं त्याचा विकास कल्पनातींत वेगानें चालूं असून प्रत्येक दशकांतील प्रगति त्या त्या काळच्या लोकांना व समाजधूरीणांना तोंडांत बोट घालावयास लावील अशी होती व पुढील दशकांत काय होईल याची कल्पनाहि करणें त्यांना कठीण जात होतें. या वैज्ञानिक प्रगतीचा सामान्य व व्यावहारिक भाषेंतील अर्थ कोणता हें पाहूं गेल्यास आपल्या सहज लक्षांत येतें कीं ही प्रगति म्हणजे मुख्यतः शक्ति व वेग यांची प्रगति होय. विज्ञान जसजसें प्रगत होत गेलें तसतशी त्याचा उपयोग करणारांची पाशवी शक्ति व अंतर आक्रमिण्याचा वेग वाढत गेला.

### विज्ञानामुळें राज्यें बलिष्ठ व व्यक्ति निर्बल

येथें एक मुद्दा विशेष लक्षांत घेण्याजोगा आहे. तो असा कीं ही प्रगति वृद्धिंगत प्रमाणांत साध्य करण्याचें कार्य जरी शास्त्रज्ञ करीत असले तरी तदंगभूत शक्ति व वेग यांवर मात्र त्या त्या देशांतील (व तदनंतर इतरहि देशांतील) सरकारांचेंच वर्चस्व होत गेलें. म्हणजेच वैज्ञानिक प्रगतीमुळें देशोदेशींचीं सरकारें प्रबळ होत गेलीं व सर्वसामान्य जनता आहे तशीच राहिली म्हणजेच तुलनेनें दुर्बळ होत गेली. सरकार शक्य करून देईल तितक्याच प्रमाणांत तिच्या शक्तिवेगांत वाढ झाली. याचें कारण असें दिसतें कीं वैज्ञानिक संशोधन व प्रगतीसाठीं अवश्य असा अमाप पैसा, प्रचंड संघटना व कल्पनातीत साधन सामग्री ही उपलब्ध करून देणें फक्त सरकारलाच शक्य होतें. एखादद्दुसऱ्या व्यक्तीकडून होणारें हें कामच नव्हे. अशा तऱ्हेनें सरकारें जों जों प्रबळ होत चाल्लीं तों तों मानवी स्वातंत्र्याचा एका अर्थानें संकोच होत चालला. राजकीय क्षेत्रांतील लोकशाही कल्पनांमुळें या संकोचास शह बसण्याची शक्यता निर्माण झाली हें खरें परंतु त्यांतहि हें लक्षांत घ्यावयास हवें कीं या कल्पना अद्यापपावेतो कित्येक राष्ट्रांत पुरेशा प्रमाणांत कार्यान्वित होऊं शकल्या नाहींत व जेथें झाल्या तेथेंहि त्या १००% अमलांत येणें क्वचितच शक्य झालें. शिवाय प्रगत देशांतील सरकारांनीं वैज्ञानिक पाशवी शक्तीचा स्वतः किंवा आपल्या प्रजेकरवीं यथास्थित उपयोग करून घेऊन मोठमोठीं साम्राज्यें स्थापलीं व यामुळेंहि मानवी समाजांतील बराच मोठा भाग दुर्बळच राहिला. तात्पर्य असें कीं लोकशाही कल्पनांच्या उदयानंतरहि वैज्ञानिक प्रगतीमुळें सर्व सामान्यपणे सरकारें बलिष्ठ होत गेलीं व जनता निर्बल बनत चालली ही परिस्थिति जगाच्या मोठ्या भागांत कायमच राहिली. आज जगांतील बहुसंख्य देशांत परिस्थिती अशी आहे कीं त्यांतील लष्करानें मनांतच आणलें अथवा सरकार व लष्कर यांनीं एकमत केलें तर ते स्वदेशबांधवास वाटेल तसें भरडून काढूं शकतील अथवा अक्षरशः गुलाम बनवूं शकतील; व संहारात्मक सर्व साधनांनीं सुसज्ज असल्यानें त्यांना उखडून लावणें जनतेस अगदीं अशक्य नसलें तरी अतीशय कठीण होईल. हंगेरी व पाकिस्तान या देशांतील घटनांवरून याची साक्ष पटेल. प्रत्यक्षतः व सांगून सवरून हुकूमशाही सरकार असलेल्या देशांबद्दल तर बोलावयासच नको.

### विज्ञानानें मानवी स्वावलंबनाचा संकोच

वैज्ञानिक प्रगतीमुळें मानवी स्वातंत्र्याचा दुसऱ्याहि एका अर्थानें संकोच होत गेला. पाणी,






अन्नवस्त्र, निवारा, व उदर-निर्वाहाचीं साधनें इ. मूलभूत गरजा पुऱ्या होण्याच्या बाबतींत विज्ञान कालपूर्व माणूस पुष्कळसा स्वावलंबी असे. फारतर नजीकचीं अथवा जवळपासच्या क्षेत्रांतील माणसें थोडीफार परस्परावलंबी असत. तीं शासनावलंबी मात्र बहुधा नसत. पाण्यासाठीं बहुतेकांच्या आवारांत विहिरी असत. प्रकाशासाठीं समयांसारखे दिवे असत. दिव्यासाठीं तेल वा तूप घरचेंच असे अथवा गांवांतील घाण्यांतून मिळे. घाण्यासाठीं गळिताचीं धान्यें जवळपासच उपलब्ध होत. याचप्रमाणें गांवाच्या परिसरांत प्राप्त होणाऱ्या माती, लाकूड इ. चा उपयोग करून स्वतःच्या सोयीचीं घरें बांधलीं जात. पहाटें कोंबडा आरवला कीं उठून स्वस्थपणें प्रातर्विधी व न्याहारी आटोपून माणसें शेतीवर जात अथवा इतर उद्योगाला लागत. वस्त्रांसाठीं गावांतील पुष्कळशा घरीं माग असत. मुख्य वस्ती खेड्यांत व शहरें थोडींच व तींहि बेताचीच विस्तार असलेलीं. यामुळें माणसें स्वावलंबी व स्वतंत्र असत व शक्ति केंद्रित होण्याचा प्रश्न फारसा नव्हताच. लोकांवर दैनंदिन हुकमत अशी फारशी कोणाची नसे. विज्ञानामुळें हा सर्व जमाना झपाट्यानें पालटूं लागला. शहरें वाढूं लागलीं व तेथें सत्तेचें केंद्रीकरण होऊं लागलें. मूलभूत गरजांच्या बाबतींतहि जनता अधिकाधिक शासनावलंबी बनूं लागली. पाण्यासाठीं नळ, प्रकाश व इतर शक्तीसाठीं वीज, निवासस्थानांसाठीं लोखंड व सीमेंट, अन्नधान्यासाठीं सरकारी दुकानें, शेतीसाठीं अवजारें, बी बियाणें इ. सर्वच बाबतींत जनतेला वाढतें परावलंबित्व येऊं लागलें. सरकारी कार्यक्षेत्रें व तसेंच मोठमोठ्या गिरण्या, कारखाने व संस्था वाढूं लागल्यानें लोकांना स्वतंत्र उद्योगापेक्षां नोकरीचें आकर्षण व चटक लागूं लागली. या व अशा सर्व कारणांमुळें त्यांच्या स्वातंत्र्याचा संकोच होत गेला. यांत अमूक चांगलें झालें अथवा अमूक वाईट झालें असा अभिप्राय व्यक्तविण्याचा हेतू येथें नसून फक्त वस्तुस्थिति समजून घेण्याचा हेतू आहे. सत्तेचें वाढतें केंद्रीकरण व तज्जन्य मानवी परावलंबित्व याचा स्वाभाविक मनोवैज्ञानिक परिणाम (Psychological effect) म्हणजे मनुष्याच्या स्वाभिमानाला तडा जाणें हा होय. यामुळें तो मानसिक दृष्ट्या अधिकाधिक दुर्बल व असहाय्य बनत जातो. जोपर्यंत यांत्रिक सुखसोयी व्यवस्थित चालूं असतात तोपर्यंत हे परिणाम तितकेसे जाणवत नाहींत किंबहुना लक्षांतहि येत नाहींत. परंतु त्यांच्यांत कोणत्याहि कारणांनीं व्यत्यय अथवा विक्षेप उत्पन्न झाल्याबरोबर माणसाला त्याची जाणीव तीव्र स्वरूपांत झाल्याशिवाय रहात नाहीं. उदाहरणच द्यावयाचें झाल्यास आपल्या देशांत नुकत्याच घडलेल्या साखर व घासलेटच्या टंचाईनें सर्वत्र कसा गोंधळ उडविला होता तो पहावा.

## विज्ञानानें संपत्तीला अवाजवी महत्त्व

वैज्ञानिक व तज्जन्य यांत्रिक संस्कृतीचा माणसांवर आणखीहि एक परिणाम झालेला दिसून येतो. तो म्हणजे समाजांत संपत्तीचें महत्त्व वाजवीपेक्षां अधिक वाढणें हा होय. यांत्रिक संस्कृति ही अपरिहार्यपणें संपत्तिप्रधान बनत जाते. संपत्तिप्राधान्यांत मूलतः कांहीं गैर आहे असें नाहीं. परंतु त्यामुळें इतर सामाजिक, नैतिक व मानवी मूल्यें अवगणलीं जातात, संपत्तिपुढें त्यांचें महत्त्व टिकून रहाणें कठिण किंबहुना अशक्य होत जातें व परिणामीं माणसांतल्या मानवतेला ओहोटी लागते. हा खरा धोका आहे. ऐहिक दृष्ट्या संपन्न होत चाललेल्या समाजविभागांतून मानवतेचा जर ऱ्हास होऊं लागला तर त्यायोगें मानवी भवितव्याचेंच कोणत्याना कोणत्या स्वरूपांत नष्टचर्य ओढविल्याशिवाय राहणार नाहीं. एका अर्थानें असहाय्य व दुर्बल होत जाणाऱ्या मानवी समूहांतील मानवता स्वातंत्र्य व आत्मविश्वासाची भावना रक्षणाचें व



अनुक्रमणिका






संवर्धनाचें कार्य वैज्ञानिक यंत्रप्रधान व संपत्तिप्रधान संस्कृतींत कसें होणार व कोणत्याहि प्रकारच्या स्वदेशी व परदेशी आक्रमणास यशस्वी रीत्या तोंड देऊन स्वाभिमानानें जगणें त्याला कसें शक्य होणार हा वैज्ञानिक संस्कृतीपुढें उत्पन्न झालेल्या परिस्थितीचा अत्यंत महत्त्वाचा व मूलभूत स्वरूपाचा प्रश्न आहे व तो वैज्ञानिक प्रगतीशी समांतर असा अधिकाधिक तीव्र होत आहे.

### आधुनिक मानवी जीवनांतील आंतर-विरोध

वरील विवेचनावरून हें स्पष्ट होईल कीं वैज्ञानिक व यांत्रिक प्रगतीमुळें मानवी जीवनांत एक प्रकारचा आंतरविरोध उत्पन्न होऊन वाढीला लागला आहे. एका अर्थानें माणूस अधिकाधिक सामर्थ्यसंपन्न बनत असतांनाच दुसऱ्या अर्थानें तो अधिकाधिक दुर्बल, असहाय्य व परावलंबी बनत आहे. सामर्थ्यसंपन्न भौतिक अर्थानें व दुर्बल, मानसिक व अध्यात्मिक अर्थानें. या आंतरविरोधांतून सुटका होण्याचा मार्ग न सांपडला तर मनुष्याचें भवितव्य जरा चिंताजनकच दिसतें. विशेष खेदाची गोष्ट अशी कीं या आंतरविरोधाची टोचणी अथवा बोचणी सामान्य जनतेलाच काय परंतु समाजधुरीणांनाहि लागावी तितक्या प्रमाणांत लागलेली दिसत नाहीं व यामुळें समाजजीवनांत कृत्रिमता, नैतिक व सामाजिक मूल्यांबद्दलची उपेक्षा व अश्रद्धा, स्वार्थैकदृष्टि, भपकेबाजपणा इत्यादिची वाढ होत आहे. थोडक्यांत म्हणजे मनुष्यांतील अध्यात्मिकतेला सुरुंग लागत आहे, व कोणीतरी लाल कंदील दाखवून हें अटकाविल्याशिवाय व त्याला योग्य मार्ग दाखविल्याशिवाय परिस्थितीचें गांभीर्य कमी होणें कठीण दिसतें. विज्ञान व यंत्राधिष्ठित संस्कृतीचा प्रसार हळूं हळूं जगांतील सर्वच भागांत होत असल्यानें, नव्हे, तों परिपूर्ण व सर्वांगीण असा घडवून आणण्याची अहमहमिकाच निरनिराळ्या प्रदेशांत चालूं असल्यानें त्या संस्कृतीचे वर उल्लेखिलेले परिणामहि सर्वत्र पसरत आहेत. स्वाभाविकच मानवांतील मानवता व अध्यात्मिकता सर्वत्र वाढत्या प्रमाणांत लोप पावत आहे. म. गांधींचें कार्य जरी भारतीय स्वातंत्र्य संग्रामापुरतें मर्यादित दिसत असलें तरी ते वर वर्णिलेल्या जागतिक परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर झालेलें असल्यानें त्याचें मूल्य त्या दृष्टीनेंहि लक्षांत घ्यावयास हवें.

### सरकार व सत्याग्रह

म. गांधींच्या संपूर्ण विचारसरणीचें मूल्य करावयाचें झाल्यास लेखाचा प्रपंच फारच मोठा होईल. परंतु आपला मुद्दा लक्षांत येण्यासाठीं त्याची गरजच नाहीं. त्याचीं चारदोन सर्वप्रसिद्ध अशीं तत्वें पाहिल्यानेंहि हें उद्दिष्ट साध्य होऊं शकेल. तीं तत्वें अशीं—

( १ ) सरकार कितीहि बलिष्ठ व संहारास्त्रानें सुसज्ज असलें तरी सामान्य निःशस्त्र जनतेनें निराश होण्याचें कारण नाहीं. सत्याग्रहाच्या निःशस्त्र प्रतिकारानें अशा सरकारला वांकवितां येईल.

( २ ) हा प्रतिकार यशस्वी व्हावयाचा असेल तर सर्वांगीण सत्य व अहिंसेचें पथ्य कटाक्षानें पाहावयास हवें. प्रतिपक्षाच्या रक्ताचा एकहि बिंदु आपल्या कृत्यांमुळें सांडतां उपयोगी नाहीं.

( ३ ) सत्याग्रहाच्या यशस्वितेसाठीं स्वावलंबन व असहकार यांचें फार मोठें महत्त्व आहे.

थोडक्यांत म्हणजे स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याचा मनोनिग्रह व त्यासाठीं अवश्य ते कष्ट व स्वार्थत्याग यांची तयारी करून राजकारण चालविणें व राजकारणाचें अध्यात्मीकरण करणें हें म. गांधींच्या शिकवणुकीचें व कार्याचें मुख्य सूत्र होय असें म्हणतां येईल. हें सूत्र व त्याच्या जोडीला म. गांधींची साधुवृत्ति व संघटना कौशल्य यामुळें स्वातंत्र्याची ज्योत समाजांतील अगदी खालच्या वर्गापर्यंत व खेडोपाडीं पसरून राष्ट्रांत नवचैतन्य उत्पन्न झालें व तें प्रत्यही वाढत जाऊन देश स्वतंत्र करण्याच्या कामांत त्यानें महत्त्वाचा वांटा उचलला. हें






कार्य भारतापुरतेंच मर्यादित असलें तरी त्यानें जगांतील सर्व पददलित जनतेला एक नवीन संदेश, नवीन दृष्टि व नवीन साधन उपलब्ध करून दिलें. यंत्रयुगामुळें मनुष्यांतील अध्यात्मिक अंश मागें पडून पाशवी अंशाला खतपाणी मिळत होतें; एकीकडे पाशवी शक्तीमुळें मदांधता उत्पन्न होऊन मानवतेचा लोप होत होता तर दुसरीकडे जगांतील बहुसंख्य पददलित व परतंत्र जनतेंत स्वतःची कर्तबगारी व भवितव्य या बाबतींत नैराश्य वाढत्या प्रमाणांत पसरत चाललेलें होतें. आपणहि माणसें आहोंत ही जाणीवच जणुं लुप्तप्राय होत होती व त्यांचें जिणें पशुवत् होण्याचा धोका उत्पन्न होत होता. जगांतील विचारवंतांना ह्या धोक्याची जाणीव वाढत्या प्रमाणात होत होती परंतु या प्रवाहास कोठें व कसें रोखावें हें लक्षांत येत नव्हतें; व रोखल्यानंतर त्यांतून नवीन मार्ग कोणता दाखवावा याचा बोध होत नव्हता. आजपावेतों अनेक संत-महंतांनीं व इतरांनीं मानवतेचें रक्षण व जोपासना करण्याचें महत्व वर्णिलेलें आहे परंतु या विचारांना कृतीची जोड कशी द्यावी याबाबतींत ते बहुधा मुग्धच दिसतात. हें विचारांना कार्यवाहींत उतरविण्याचें कार्य म. गांधींनीं करून दाखविलें व यांतच त्यांचें अलौकिकत्व आहे. त्यांनीं राज्यकर्त्यांच्या अंतःकरणाला आवाहन करून पाशवी शक्तींत अध्यात्मिकता उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला व त्याचबरोबर या शक्तीशीं निःशस्त्र मार्गानेंहि मुकाबला करतां येतो व म्हणून कोणत्याहि पददलित जनतेला आपल्या भवितव्याबद्दल केव्हांहि निराश होण्याचें कारण नाहीं असें प्रतिपादून तिच्यांत चैतन्य उत्पन्न केलें, व तें प्रत्यक्ष कृतीनें पटवून दिलें. निवळ सिद्धान्त प्रतिपादकांची जगांत केव्हांहि वाण नसते. सिद्धांतांना व्यावहारिक स्वरूप देऊन कार्यवाहींत कसें आणावें हा नेहमीं खरा प्रश्न असतो. म. गांधींनी आपल्या सिद्धांतांना असें स्वरूप प्रत्यक्ष देऊन दाखविलें व त्यायोगें पददलितांतील चैतन्य जागृत केलें हा त्यांचा खरा मोठेपणा होय.

म. गांधींच्या राजकारणावर अनेक आक्षेप अगदी सुरवातीपासून घेण्यांत येत होते. व ते घेणारी कित्येक मंडळी अगदी प्रामाणिक होती. या आक्षेपांचें स्वरूप असें कीं म. गांधींना मनुष्यस्वभावाचें ज्ञान कमी होतें, त्यांनीं आपल्याभोंवतीं जमविलेल्या गोतावळ्यांत भोंदू व स्वार्थी लोकांचाच भरणा विशेष होता. त्यांनीं (गांधींनीं) मुसलमानांना लाडावून ठेवल्यानेंच देशाचीं शकलें झालीं. या प्रकारच्या आक्षेपांत थोडेंफार तथ्य आहे असें आमचेंहि मत आहे. परंतु हे व असेच इतर सर्व आक्षेप शंभर टक्के खरे आहेत असें मानलें तरीहि मानवजातीच्या दृष्टीनें त्यांच्या कार्याच्या या लेखांत सूत्ररूपानें सांगितलेल्या महत्वास यत्किंचितहि बाध येत नाहीं असें आम्हांस वाटतें.

जगांतील सर्व पददलित जनतेला दिलासा वाटेल आधार वाटेल अशा ज्या मार्गाचें अवलंबन म. गांधींनीं भारतीय राजकारणांत केलें त्या मागील मूलभूत प्रेरक शक्तीहि विचारांत घेण्यासारखी आहे. मनुष्यांतील अध्यात्मिकतेचा स्फुलिंग जागृत आहे परंतु वैज्ञानिक युगांत त्यावर राखेचा थर सांचलेला आहे. हा थर जर बाजूला केला तर मुळांत जागृत असलेलें स्फुलिंग आपल्या तेजानें तळपूं लागेल, मनुष्यांतील मनुष्यत्व उफाळून वर येईल व त्यांतील अध्यात्मिकता पाशवतेवर मात करील अशी नितान्त श्रद्धा हीच ती प्रेरक शक्ति होय. यांत विशेष लक्षांत घेण्यासारखी बाब अशी कीं हा स्फुलिंग वेगवेगळ्या अर्थानें व कमिजास्त प्रमाणांत समाजांतील सत्ताधिष्ठित व पददलित, जित व जेते, सशस्त्र व निःशस्त्र या दोन्ही वर्गांत जागृत होतो. निःशस्त्र, पददलित व जित जनतेंतील मनुष्यत्व हक्कांच्या जाणीवेंत प्रकट होऊन त्यासाठीं लढा देण्यास प्रवृत्त होतें. मानवी हक्कांची जाणीव तिच्यात








वाढत्या प्रमाणांत तीव्र होऊं लागते व त्या हक्कांच्या संपादनार्थ लढा देण्याइतपत तिच्या मनाची तयारी होते. उलटपक्षीं सत्ताधारी जेते व सशस्त्र लोकांना आपल्या सामर्थ्यास मर्यादा घालून पददलितांना जितांना त्यांचे योग्य हक्क देऊन टाकण्यास प्रवृत्त करते. म. गांधींनी बाळगलेली ही श्रद्धा अवास्तव अथवा अस्थानी नव्हती असेंच निदान भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाचा इतिहास सांगतो. मीठ, अरण्य व वैय्यक्तिक सत्याग्रहांत अक्षरशः लाखो लोकांनीं भाग घेतला असतांहि व सामुदायिक पाया निर्बंध भंगाचे शेंकडों प्रकार भारतांत ठिकठिकाणीं घडत असतांहि लाठीहल्ले, गोळीबार इत्यादि पाशवी साधनांचा अवलंब परकीय सरकारनें तुलनात्मक दृष्ट्या अगदी बेताचा केला. हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणांत गोरी फौज व तिच्या हातीं कत्तलीचीं अद्यावत् साधनें असतांना या सामर्थ्याचा परिपूर्ण उपयोग करून व लोकांचे अक्षरशः बळी घेऊन चळवळ चिरडून टाकणें ब्रिटिश राज्यकर्त्यांना सर्वस्वी अशक्य होतें असें म्हणतां येत नाहीं. जालियनवाला बागेच्या कत्तलीवरून हें लक्षांत येईल. परंतु निःशस्त्र व अहिंसेची शपथ घेतलेल्या जमावावर बेदरकारपणें हत्यार कसें व कितपत चालवावें असा संभ्रम त्यांच्या मनांत उत्पन्न झाला म्हणजेच त्यांच्यांतील मनुष्यत्व व अध्यात्मिकता जागृत झाली. जगांतील बऱ्याच भागांतून भारतीय संग्रामास नैतिक पाठिंबा मिळाला हाहि मानवजातींतील या जागृतीचाच पुरावा होय. निःशस्त्र प्रतिकाराचें जें साधन पददलितांच्या हातीं म. गांधींनीं दिलें त्याच्या परिणामकारित्वाचा पुरावा अप्रत्यक्षपणें इतर देशांतूनहि मिळण्यासारखा आहे. ब्रिटिशांनीं हिंदुस्थानांतून पाय काढता घेतल्यावर गेल्या दहा बारा वर्षांत आशिया व आफ्रिका खंडांतील कित्येक राष्ट्रें पाश्चात्य साम्राज्यशाहीच्या मगरमिठींतून मुक्त झालीं व तींहि बहुतेक सशस्त्र क्रान्तीचा आश्रय न घेतां. या सर्वांनीं म. गांधींच्या साधनाचा प्रत्यक्ष उपयोग केला असें जरी म्हणतां येत नसलें तरी या साधनाचा फायदा त्यांना मिळाला असें नक्की म्हणतां येईल. नाहीतर साम्राज्यवादी बलिष्ठ राष्ट्रें आपल्या पंजाखालील देश सहजासहजी सोडते ना. येथें एक गोष्ट मात्र लक्षांत घेतली पाहिजे कीं निःशस्त्र प्रतिकाराच्या चळवळीनें हिंदुस्थानांत जें रूप घेतलें अगदी तसेंच रूप इतरत्र दिसलें तरच ती गांधीप्रणीत चळवळ, नाहींतर नाहीं असा आडमुठेपणाचा अर्थ लावणें इष्ट नाहीं. देशकालपरिस्थितीनुरूप चळवळ निरनिराळ्या स्वरूपांत प्रकट होणें अगदी स्वाभाविक आहे. परंतु या तपशिलाच्या भेदामुळे मूळ तात्त्विक विवेचनास बाध येत नाहीं. तसेंच या सर्व चळवळयांनीं म. गांधींना गुरु केलें होतें कीं काय याचाहि शोध करण्यांत हंशील नाहीं. निःशस्त्र व पददलित जनतेंत स्फुलिंग जागृत झाला व विशेष स्वरूपाच्या कत्तली न होतां तो कार्यान्वित बनला इतकाच मुद्दा महत्वाचा आहे.

## सत्याग्रहावरील आक्षेप

या लेखांतील विवेचनावर असा आक्षेप देण्याचा संभव आहे कीं सत्ताधारी व पददलित यांच्यांतील अनुक्रमें मानवता व आत्मविश्वास जागृत करण्याचें सामर्थ्य जर सत्याग्रहांत खरोखर असतें तर गोवें सत्याग्रहाच्या वेळीं तें कां प्रगट झालें नाहीं ? याचीं अनेक कारणें आहेत. त्या सर्वांचें परीक्षण येथें करण्याची आवश्यकता नाहीं. एकदोन मुद्यांचा विचार येथें पुरेसा होईल. गोव्याशीं संबंधित असलेले एक गृहस्थ आम्हांला एकदां असें म्हणत होते कीं स्वतंत्र भारतांतील सामान्य जनतेची गेल्या १०।१२ वर्षांतील आर्थिक ससेहोलपट व तिच्यावर लादण्यांत आलेले अनेकविध निर्बंध ( कायदे ) पाहून असल्या स्वातंत्र्यापेक्षां आपलें पोर्तुगीज राज्य बरें असें गोव्यांतील बहुसंख्य जनतेला वाटत असल्यानें तिनें सत्याग्रहांत खराखुरा व मनापासून असा भाग आज पावेतों घेतलाच नाहीं. या म्हणण्यांत






कितपत तथ्य आहे हें प्रत्यक्ष माहितीच्या अभावीं आम्ही सांगूं शकत नाहीं. परंतु तें सर्वस्वी असत्य आहे असें जरी गृहीत धरलें तरी त्यावरून सत्याग्रहाचें शस्त्र निरुपयोगी कसें ठरतें हें लक्षांत येत नाहीं. हें शस्त्र पहिल्यांच झटक्यांत अथवा प्रत्येक वेळीं यशस्वीच होईल असा नियम नाहीं. इतर पथ्यापथ्य व परिस्थितीवरहि बऱ्याच गोष्टी अवलंबून असतात. शिवाय मनुष्य स्वभाव आहे असा लक्षांत घेतां तत्संबंधीं सदासर्वकाल व शंभर टक्के लागूं होईल असा सिद्धान्त बांधणें कठीणच आहे. परंतु केवळ यामुळेंहि विज्ञानाच्या पार्श्वभूमीवर सत्याग्रहाचें महत्त्व उपेक्षणीय ठरवितां येणार नाहीं. मानसिक व अध्यात्मिक सामर्थ्यांचें संवर्धन हळूं हळूं होत असतें व तें जसजसें होत जाईल तसतसें अधिकाधिक प्रभावी बनत जातें. ब्रिटिशांच्याहि बाबतींत म. गांधींचा सत्याग्रह पहिल्याच तडाक्यांत यशस्वी झाला असें नाहीं. त्यासाठीं जनतेच्या मनाची अवश्य ती तयारी करण्यांत कित्येक वर्षे खर्चीं पडलीं. परंतु या काळांतील जनतेची ही तयारी सत्याग्रहाच्या मार्गानेंच होत गेली हें विसरून चालणार नाहीं. म्हणून गोव्याच्या उदाहरणानें सत्याग्रहाचें महत्त्व कमी करूं पहाणें हें केव्हांहि योग्य ठरणार नाहीं.

दुसरा एक आक्षेप असा संभवतो कीं भारतीय स्वातंत्र्याचें स्वप्न साकार करण्यांत म. गांधींच्या साधनापेक्षां नेताजी सुभाषचंद्र बोसांची सैनिकी कारवाई व महायुद्धांतील प्रचंड हानीमुळें ब्रिटिश साम्राज्याला आलेली दुर्बळता यांचा अधिक भाग आहे. हें म्हणणें जितकें खरें आहे तितकेंच हेंहि खरें आहे कीं म. गांधींनीं सत्याग्रहाच्या साधनानें सामान्य जनतेंतील स्फुल्लिंग जागृत करून पेटविला नसता तर वरील दोन्ही कारणांनीं सुद्धां भारतांतील ब्रिटिश साम्राज्याचा अस्त प्रत्यक्ष झाला त्यावेळीं झाला नसता. केवळ म. गांधींच्या चळवळीमुळे भारताला स्वातंत्र्य मिळालें असें पक्षांध माणसाखेरीज इतर कोणीहि सूज्ञ म्हणणार नाहीं व या लेखाचेंहि तें प्रतिपादन नाहीं. प्रतिपादन इतकेंच आहे कीं सर्वसामर्थ्यवानांशीं संबंध आला असतां त्या सामर्थ्याच्या अभावानें दुर्बल बनलेल्यामध्येंहि त्या सामर्थ्याचा प्रतिकार करूं शकेल अशी दुसऱ्या प्रकारची शक्ति असूं शकते. म्हणून कोणालाहि केव्हांहि निराश होण्याचें कारण नाहीं. माणूस हा मूलतः अध्यात्मिक असून त्याच्यांतील अध्यात्मिक शक्ति पाशवी सामर्थ्याला निदान रोखून धरण्याइतकी तरी समर्थ आहे व त्या शक्तीचा योग्य तऱ्हेनें परिपोष केल्यास दलित जनतेला तर आपल्या उद्धाराचा मार्ग सांपडेलच. शिवाय विज्ञानाच्या संहारात्मक शक्तीनें सर्व मानवजातीचेंच उच्चाटन होण्याची जी भीति चालू युगांत उत्पन्न झालेली आहे तिचेंहि परिमार्जन होऊं शकेल ही गोष्ट सर्व जगाच्या निदर्शनास प्रत्यक्ष कृतीनें आणणें व त्यायोगें मनुष्याची प्रतिष्ठा वाढविणें हेंच म. गांधींच्या कार्याचें मानवतेच्या दृष्टीनें मूलभूत व शाश्वत स्वरूपाचें रहस्य होय असें आम्हांस वाटतें. राजकीय दृष्टीनें सध्याचें युग राष्ट्रीयत्वाचें असल्यानें राष्ट्रीयत्वाच्या प्रचंड नगाऱ्याचा धुमाकूळ कोणत्याना कोणत्या स्वरूपांत सर्वत्र चालू आहे. या धूमधडाक्यांत-कोलाहलांत या रहस्याचा आवाज लुप्त होऊं नये अथवा मागे पडूं नये नव्हें त्याची सर्वांगीण जोपासनाच व्हावी व असें करणें हेंच मानवजातीच्या अंतिम हिताचें आहे असें जगांतील सर्वच जनतेसमोर पुन्हां पुन्हां मांडणें अवश्य वाटतें तें यामुळेंच.

---



अनुक्रमणिका






# मेट्रिक वजनांचा वापर सक्तीचा आहे

ता. १ ऑक्टोबर १९६० पासून खाली दिलेल्या क्षेत्रांत सर्व व्यवहारांसाठी मेट्रिक वजनेंच वापरलीं पाहिजेत. व व्यापारी व्यवहारातील मेट्रिक वजनांवर वजनमापांच्या कचेरीची मोहोर असली पाहिजे. याशिवाय अन्य कोणतींहि वजनें वापरणें बेकायदेशीर ठरेल.

**आंध्र प्रदेश :** विशाखापट्टणम्, कृष्णा, गुंटूर, कर्नूल, हैद्राबाद, वरंगळ, निझामाबाद जिल्हे आणि राज्यांतील सर्व नियंत्रित बाजारपेठा.

**आसाम :** नौगांव जिल्हा आणि गौहती शहर.

**बिहार :** भागलपुर आणि रांची विभाग आणि पाटणा व तिरहत विभागांतील म्युनिसिपल व नोटिफाईड क्षेत्र.

**गुजरात :** अहमदाबाद, राजकोट, व बडोदे शहरें आणि राज्यांतील सर्व नियंत्रित बाजारपेठा.

**केरळ :** कोझिकोड, एर्नाकुलम् आणि क्विलॉन जिल्हे.

**मध्य प्रदेश :** सेहोर, इंदूर, ग्वाल्हेर आणि जबलपुर जिल्हे आणि राज्यांतील सर्व नियंत्रित बाजारपेठा.

**मद्रास :** मद्रास, चिंगलपट, दक्षिण अर्काट व उत्तर अर्काट जिल्हे आणि राज्यांतील सर्व नियंत्रित बाजारपेठा.

**महाराष्ट्र :** मुंबई, पुणें, नागपूर, औरंगाबाद, सोलापूर, कोल्हापूर, अकोला, अमरावती, वर्धा व यवतमाळ शहरें आणि राज्यांतील सर्व नियंत्रित बाजारपेठा.

**म्हैसूर :** बंगलोर, रायचूर व धारवाड जिल्हे आणि राज्यातील सर्व नियंत्रित बाजारपेठा.

**ओरिसा :** ब्रह्मपुर, कटक आणि संबळपुर शहरें.

**पंजाब :** अमृतसर, जालंदर, लुधियाना, अंबाला, पतियाळा व गुरगांव जिल्हे आणि राज्यातील सर्व नियंत्रित बाजारपेठा.

**राजस्थान :** अजमीर, बिकानेर, जोधपूर, जयपूर, कोटा आणि उदेपूर जिल्हे.

**उत्तर प्रदेश :** मीरत, आग्रा, लखनौ, बरेली, मोरादाबाद, वाराणसी, कानपूर, झांसी, अलाहाबाद आणि गोरखपूर शहरें.

**पश्चिम बंगाल :** कलकत्ता आणि हावरा शहरांचें म्युनिसिपल क्षेत्र.

**दिल्ली :** संपूर्ण दिल्ली.

**हिमाचल प्रदेश :** मंडी आणि सिरमुर जिल्हे.

**मणिपुर :** इंफाळ शहर.

**त्रिपुरा :** आगरताळा शहर.

**अंदमान आणि निकोबार बेटें :** पोर्ट ब्लेअर शहर.

**पाँडिचरी :** संपूर्ण पाँडिचरी.

खाली दिलेल्या व्यापार व उद्योगधंद्यांच्या व्यवहारात मेट्रिक वजनांचा आणि परिमाणांचा वापर सक्तीचा आहे :—

ताग, सुती कापड, लोखंड आणि पोलाद, इंजिनिअरिंग, अवजड रसायनें, सीमेंट, मीठ, कागद, रिफ्रॅक्टरीज अलोहित धातू, आणि रबराचा उद्योगधंदा, वनस्पति, साबण व लोकरीच्या वस्तु तसेंच कॉफी बोर्डाच्या व्यवहारात आणि कापडाच्या वायदे बाजाराचें नियंत्रण.

## मेट्रिक पद्धति

### साम्य व सरलतेसाठीं

**भारत सरकार द्वारा प्रकाशित.**

डीए. ६०(४०९)

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# मास्को--दर्शन

(१)

प्राच्यविद्या विशारदांच्या विश्वपरिषदेकरितां मी जाण्यास निघालो तेव्हां प्रथम मनांत अशी खूणगांठ बांधली कीं तेथें गेल्यावर सगळें कांही मनांत आढी न ठेवतां पहावयाचें. मी एका काळीं मार्क्सवादी व रशियन लालक्रांतीचा पुरस्कर्ता होतों व अलीकडे मार्क्सवादाचा टीकाकार बनलों आहे; रशियन लालक्रांतीबद्दलच्या माझ्या अनेक अपेक्षा विफल झाल्या आहेत. या दोन्ही गोष्टींचा अवलोकन करीत असतां उपयोग होणार आहे असें माझ्या मनांत आलें. वस्तुवादी दृष्टिकोणांतूनच सर्व कांहीं पाहिलें पाहिजे असा माझा आग्रह आहे. मास्कोला जाण्याची कधींकाळी संधी मिळेल असें मला स्वप्नांतहि वाटलें नव्हतें. फार महत्त्वाच्या अनेक गोष्टी योगायोगानें व अनपेक्षित रीतीनें माझ्या आयुष्यांत घडल्या आहेत त्यापैकींच हें मास्कोचें दर्शन होय.

तारीख ६ ऑगस्ट १९६० रोजीं प्रातःकालीं ५॥ वाजतां माझे दिल्लीचे मित्र श्री. गिरिलाल जैन यांनी पालम विमानतळावर स्वतःच्या मोटारीतून मला पोचविलें. तेथे प्राच्यविद्या-परिषदेस माझ्या प्रमाणेंच निघालेले भांडारकर-ओरिएन्टल इन्स्टिट्यूटचे डॉ. रामभाऊ दांडेकर भेटले. आम्हांस निरोप देण्याकरितां भारतसरकारच्या संस्कृति व संशोधन खात्याचे कांही अधिकारी उपस्थित होते. त्यांत माझ्या ओळखीच्या श्री. कपिला वात्स्यायन याहि आल्या होत्या. विमानाकडे निघतांना त्यांनी आम्हा सर्वांचा म्हणजे भारतसरकारच्या वतीने जाणाऱ्या प्रतिनिधींचा फोटो काढला. त्यांत दिल्ली, हैद्राबाद, अलिगड, कलकत्ता, मद्रास, येथील अरबी, फारसी, उर्दू, तमिल, संस्कृत इत्यादि भाषांचे आणि पुरातत्त्वाचे पंडित होते. त्या दिवशी एअर इंडियाचें विमान मिळण्याऐवजीं आम्हास रशियन एरो फ्लोट कंपनीचें सरकारी जेट विमान मिळालें. हें विमान हिमालयाच्या उंच शिखरांवरून जवळच्या मार्गानें निघालें. भारतीय विमान लांबच्या मार्गानें काबूल-कंदाहरावरून जातें व त्याला दुप्पट वेळ लागतो. एरोफ्लोटचें विमान अर्ध्या तासांत हिमालयांतील चिरंतन बर्फाच्छादित शिखरांवरून जाऊं लागलें. हिमालय उल्लंघित असतांना पूर्वपश्चिम पसरलेलीं सहस्रावधि हिमाच्छादित शिखरें दृष्टिपथांत समावलेलीं दिसत होतीं. पावसाळा असल्यामुळें यावेळीं सगळा हिमालय मघमालांनीं झाकून टाकलेला असतो; परंतु आम्हाला अचानकपणें हिमालयाच्या सर्व रांगा स्वच्छ उघड्या दिसल्या. गौरीशंकराची बरोबरी करूं पहाणाऱ्या शिखरांना सात–आठ हजार फूट खालीं घालून आमचें विमान भरारी मारीत चाललें होतें. मी विमानांतील रशियन परिचारिकांना इंग्रजीतून आपण सध्या कोठून चाललों आहोंत, असें विचारलें. त्यांना माझा प्रश्न समजला नाहीं. थोड्या वेळांत रशियन पायलेट माझ्या जवळ आला अन् त्यानें माझ्या प्रश्नाचें उत्तर दिलें. त्याने मला सांगितलें कीं, आपण चिनी हद्दींत शिरलों आहोत. थोड्या वेळांत आपण पामीरवर जाऊं. आपण ११ हजार मीटरवर ( ३५ हजार फुटावर ) आहोत. नंतर अर्ध्या तासांत आम्हास हिंदकूशची रांग व पामीरवरील पर्वतांची अर्धीं बर्फाच्छादित व अधा उघडीं शिखरें दिसूं लागलीं. त्यांत सर्वोच्च स्तालिन शिखरहि दिसत होतें. त्यानंतर लवकरच मध्य आशियांतील सपाट प्रदेशांच्या आंतराळांत आम्ही शिरलों. इकडे तिकडे पाहतों तोंच आमचें विमान ताश्कंद विमानतळावर उतरूं लागलें.

आम्ही ताश्कंद विमानतळावर एक तासभर वेळ घालविला. विमानतळावरील इमारतीचा घाट व इमारतीच्या भिंतींवरील नक्षीकाम मध्य आशियांतील स्थापत्यपद्धतीचें होतें. मध्य आशियांतील संस्कृतीची भारताशी फार जुनी देवाण घेवाण आहे, याची आठवण मला तेथें झाली. या विमानतळावर स्थानिक विमानवहातुकीचेंहि ठाणें आहे. त्या ठाण्यांतील उता-






रूंची ये जा मी निरखून पहात होतों. हें ठाणें मुंबई राज्यांतील एखाद्या उंब्रज-चरेगांव सारख्या एस्. टी. स्टँडसारखें जुजबी व भकास दिसलें. ताश्कंद रेडिओ-वर हिंदुस्थानींत वार्ताक्षेप करणारा एक गृहस्थहि मला तेथेंच भेटला. त्याच्याशीं गप्पा मारण्यांत विमान-सुटेपर्यंतचा वेळ मी घालविला. त्याच्याशी बोलतांना मला एक महत्त्वाची गोष्ट कळली ती ही कीं, या मुसलमानी प्रांतांतील शिक्षित लोक स्वतःचीं उज्बेकी भाषा जशी बोलतात तशीच रशियन भाषाहि बोलूं लागले आहेत. तेथील जनता हळुंहळुं दुभाषी बनत आहे. मी मनांत म्हटलें, सगळेंच जीवन भाषेसह रशियन बनविण्याची ही पहिली पायरी दिसते.

ताश्कंदहून सुमारें दोन अडीच तासांत आम्ही मास्को विमानतळावर येऊन पोहोंचलों. भारतीय वेळे-प्रमाणें ३ वाजले होते मास्कोच्या घड्याळात १ चा सुमार होता. दिल्लीहून मास्कोपर्यंत उडण्यास जेट-विमानास ५॥ तास लागतात. आम्ही उतरल्यावर आमच्या स्वागताकरितां आलेला भारतीय दूतावासां-तील एक अधिकारी आम्हास भेटला. त्यामुळें भाषेची अडचण असूनहि आमचें सामान तपासून तें परत मिळण्यास दोन तासांपेक्षा जास्त वेळ लागला नाहीं. प्राच्य–विद्या–परिषदेचा स्थानिक प्रतिनिधि आम्हांस तेथे फार उशिरा भेटला. नाहींतर आमचा किती खोळंबा झाला असतां याची कल्पना करवत नाहीं. आमच्यांतील कांहीं मंडळी युक्रेन हॉटेलकडे रवाना झाली: आम्ही मात्र परिषदेचें जेथे अधिवेशन व्हाव-याचें होतें तेथेंच उतरावयाचा बेत केला होता. परिषदेचें अधिवेशन मास्को विद्यापीठाच्या नव्या इमारतीत भरण्याचें ठरलें असल्यामुळें आमची बस मास्को विद्या-पीठाकडे निघाली.

## ( २ )

आमची बस मास्को शहराकडे जाणाऱ्या रुंद रस्त्या-वरून मास्को शहरांत शिरली. ही वेळ मास्को घड्याळा-प्रमाणे ४॥ वाजण्याची होती. दुतर्फा ६ ते १२ मजल्या-पर्यंतच्या प्रचंड इमारती व हमरस्ता १०० ते १५० फूट रुंदीचा पसरलेला. ट्रॉली, बस व मोटारी या वहानांच्या जाणाऱ्या येणाऱ्या रांगा आणि फूटपाथवर स्त्रीपुरुष नागरिकांच्या रांगा दिसूं लागल्या. या सर्वां-मध्ये लगबग व घाई असूनहि शिस्त व शांतता दिसत होती. गर्दी असूनहि गोंगाट ऐकूं येत नव्हता; दुकानें दुतर्फा दिसत होतीं; जाहिरातींच्या पाट्यांनी व लहान मोठ्या चित्रविचित्र अक्षरांनी व लेबलांनी सुरेख व भव्य इमारती विद्रुप झालेल्या दिसत नव्हत्या. रस्त्यांच्या कडेला मधून मधून उभ्या केलेल्या फलकां-वर तेवढ्या सिनेमा नाटकांच्या जाहिराती अपवादा-दाखल दिसत होत्या. जाहिराती नव्हत्या याचें कारण खाजगी उद्योग व खाजगी दुकानें यांना शहरांत अवसर नाहीं; म्हणून माल विकण्यांत स्पर्धा नाहीं; हेंच होय.

आमची बस विमानतळापासून १२ मैलांवर अस-लेल्या लेनिन टेकडीजवळ आली. लेनिन टेकडीवर मास्को विद्यापीठाची नवी इमारत बांधली आहे. ही टेकडी मास्को शहराच्या एका टोकावर आहे. या टेकडीवर मास्को विद्यापीठाची प्रचंड इमारत १९५३ सालीं बांधून पुरी केली. स्टॅलिनच्या योजनेप्रमाणें ही इमारत बांधली गेली आहे. या ३५ मजली इमारतीच्या प्रवेशद्वारावर आमची बस येऊन थांबली. या इमारतीला चारी दिशांना चार महाद्वारें आहेत. त्यांत मुख्य महाद्वारें दोन आहेत. एक प्रवेशद्वार व एक निर्गमनद्वार. प्रवेश द्वाराच्या दोन बाजूंना हातांत पुस्तक घेतलेल्या व वाचनांत मग्न असलेल्या एक विद्यार्थी व विद्यार्थिनी यांच्या भव्य मूर्ति दिसल्या. आणि निर्गमनद्वारांत दोन्ही बाजूला पुस्तकवाचनांत गढलेल्या दोन जोडप्यांच्या भव्य मूर्ति ठेवलेल्या दिसल्या. प्रवेशद्वाराजवळील भव्य दालनाला संगमरवरी पाषा-णांचे विशाल स्तंभ आहेत. या विद्यापीठाच्या इमार-तींत अनेक विद्यार्थी-वसतिगृहें आहेत. एका विद्यार्थ्यास एक खोली, अशा ८ हजार खोल्या बांधल्या आहेत. या वसतिगृहांच्या एका शाखेंत प्रतिनिधींच्या निवासाची सोय केली होती. या शाखेला १४ मजले आहेत. ७ व्या मजल्यावरील २४ क्रमांकाच्या खोलींत मी उतरलों. प्रत्येक खोलींत रबरी गादीचा कोच, पलंग, उशी, दोन चादरी, एक रग, दोन खुर्च्या, दोन टेबलें, भिंतीला तीन कपाटें, बाथरूम, संडास, थंड व उष्ण जल-नलिका, एक टॉवेल, जल-बेसिनला आरसा, व लालसाबण वडी अशी सजावट होती.








आठ हजार विद्यार्थ्यांच्या या वसतिगृहांकरितां चार भोजनगृहें जोडलेलीं आहेत असें मला तेथील मार्गदर्शकाने सांगितलें. मार्गदर्शक दुभाषी होता. माझें नांव गांव नोंदवून रहाण्याचें दहा दिवसांचें भाडें भरून पोटापाण्याच्या तजविजीस मी लागलों. आठ हजार विद्यार्थ्यांच्या वसतिगृहाला चारच भोजनगृहें आहेत हें ऐकून मी सर्दच झालों. भोजनगृह वाटाड्यानें दाखविलें. एका वेळीं जास्तींत जास्त ४००-५०० माणसें बसून जेवूं शकतील एवढयाच मापाचें एकेक भोजनगृह दिसलें. ह्या भोजनगृहांत कूपन काढून स्वतःच्याच हातानें पात्रें उचलून जेवण वाढून घ्यावयाची व्यवस्था आहे. न्याहारी, चहा, दुपारचें व संध्याकाळचें जेवण या वेळीं गर्दी उसळणार व क्यू मध्यें उभें रहावें लागणार, म्हणून मी किंचित् सचिंत झालों. परंतु खाण्यापिण्याची चिंता व विवंचना करण्याचा माझा स्वभाव नाहीं. मिळालें तरी वाहवा; नाहीं मिळालें तरी वाहवा. पंचप्राणाहुति एकदोन दिवस नाहीं दिल्या तरी फिकीर नाहीं. वाटाड्याने सांगितलें कीं उन्हाळ्याची सुट्टी असल्याने विद्यार्थी थोडेच आहेत. म्हणजे किती? असें मी विचारलें. १००० ते १५०० तो म्हणाला. एकच भोजनगृह चालूं होतें. प्रत्यक्ष पाहून, चौकशी करून, त्या प्रचंड इमारतीच्या सुंदर चक्रव्यूहांतून दालनापाठीमागून दालनें व जिने ओलांडत मी स्वस्थानाकडे परत येत होतों. वाटेंत अनपेक्षितपणे जाणाऱ्या येणाऱ्या गौरकाय विद्यार्थी-विद्यार्थिनींमध्यें शामलतनूंचे प्रौढ हिंदी विद्यार्थी चार-पांच दृष्टीस पडले. माझें लक्ष नव्हतें. त्यांनीच प्रणामपूर्वक मला वाटेंत रोखलें व विचारलें : " आपणा सर्वांची आम्ही वाट पहात होतों; सामान कोठें ठेवलें आहे?" "झोना-झे मध्यें" मी उत्तरलों. "आम्ही चाळीस भारतीय या विद्यापीठांत आसपास आहोंत." असें हिंदीमध्यें त्या विद्यार्थ्यांपैकीं स्वामिनाथन् व मुखर्जी यांनीं सांगितलें. "आम्ही आपल्या सेवेस हजर आहोत," असें चंद्रदत्त घारियाल, स्वामिनाथन्, भट्टाचारजी व भादुरी म्हणाले. "तुम्हा सर्वांना रशियन भाषा शिकावी लागली असेल" अशी मी त्यांना पृच्छा केली. ते म्हणाले, " अलबत! रशियन भाषा सहा महिनेपर्यंत लिहितां, वाचतां, बोलतां येईल. इतकी शिकल्याशिवाय आमच्या मुख्य विषयाच्या शिक्षणास प्रारंभच होत नाहीं." श्री. सुंदरेशन् म्हणाला कीं, " येथे बहुतेक आम्ही विद्यार्थी विद्यापीठाच्या उच्च शिक्षणाकरितां किंवा उच्च तंत्रज्ञानाकरितां आलेले आहोत. त्यांत एक महाराष्ट्रीयहि आहे. श्री. एम्. एस्. हुजुरबाजार, बनारस विद्यापीठाचे गणित प्राध्यापक उच्च गणित विद्येच्या अध्ययनार्थ गेलीं तीन वर्षें येथे राहिले आहेत." "मला आतां कसलीच भाषाविषयक अडचण पडणार नाहीं. रशियन दुभाष्यांनीं दाखविलेल्या व सांगितलेल्या माहितीत येथील भारतीय विद्यार्थ्यांच्या साहाय्यानें अधिक भर पडेल. मिळालेली माहिती तपासून घेता येईल." असा दिलासाच मला या विद्यार्थ्यांच्या भेटीमुळें मिळाला. मास्को विद्यापीठाचें व रशियन शिक्षण पद्धतीचें अत्यंत जवळून ज्ञान करून घेण्याची अपूर्व संधि मिळाली असें वाटून मला हर्ष झाला.

प्राच्यविद्या परिषदेच्या अधिवेशनास तीन दिवस अवकाश होता. तारीख ९ ऑगस्टला सकाळीं अधिवेशनास प्रारंभ होणार होता. एवढया वेळांत मनमुराद फिरतां येईल, असें मनांत घोळत असतां मी माझ्या खोलींत झोपीं गेलों. पहाटेस चार वाजतां खिडकीबाहेर, विद्यापीठाच्या परिसरावर दृष्टिक्षेप टाकला. चक्क उजाडलें होतें. विस्तृत मैदान व विशाल मास्को नगरी व विशेषतः मास्कोनदीचें भरलेलें संथ पात्र नजरेंत भरलें. सगळीकडे सामसूमच होती. इकडे उन्हाळयांत रात्र फार लहान असते असें वाचलें होतें, त्याची आठवण झाली. मास्को वर्णनाचें पुस्तक वाचावयास काढलें व तें दोन अडीच तासांत संपविलें. जें पहावयाचें तें अगोदर वाचलेलें असलें म्हणजे तें पाहिल्यावर बारकावा लक्षांत भरतो. आठ वाजतां प्रातःकृत्यें आटोपून अनेक हिंदी परिचित विद्यार्थ्यांना फोन केला. त्यांच्या बरोबर विद्यापीठाच्या भोजनगृहांत न्याहारी उरकली. न्याहरीच्या वेळीं दूध, चहा, कॉफी, दही, लोणी, ब्रेड, अंडीं, फळें, फळांचे रस, काकडी, (रशियांत काकडी मुबलक मिळते) खीर, भात, वगैरे अन्नखाद्य पदार्थांच्या किंमती विचारल्या व त्यांचीं रशियन नांवें दैनंदिनींत टिपून घेतलीं. शिष्टाचाराचीं दर्शक रशियन वाक्यें शुद्ध उच्चार








करतां यावा म्हणून देवनागरी लिपींत भाषांतरासह लिहून घेतलीं. श्री. हुजुरबाजार या मराठी गृहस्थांना नंतर फोन करून भेटावयास गेलों. ते व्ही. झोन मध्यें १५ व्या मजल्याच्या ४८ क्रमांकाच्या खोलींत होते त्यांना भेटलों. हें गृहस्थ विनयशील हुशार, रसिक व मोकळया मनाचे दिसले. रशियन भाषा केवळ आपल्या स्वतःच्या गणित विषयापुरतीच उपयोगी पडावी म्हणून शिकले नाहींत तर रशियन साहित्यहि त्यांनी अभ्यसिलें आहे; उत्कृष्ट समीक्षण असल्यामुळें रशियन नाट्य रंगमंच व चित्रपटहि चोखंदळपणाने त्यांनी अवलोकिलेला आहे, असें त्यांच्या सहवासांत लक्षांत आलें. त्यांच्या बरोबर मास्को-शहराचा दोनदा फेरफटका केला व रशियन दुभाष्यांबरोबर पांच वेळां मास्कोशहरांतील प्रेक्षणीय स्थळें पहाण्याकरितां हिंडलों. दिल्ली येथील सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. जैनेन्द्रकुमार यांनीहि स्वतःबरोबर मास्को-शहराची वारी दोनदां करविली. ते परिषदेकरितां आले नव्हते. त्यांना सांस्कृतिक भेटीचें निमंत्रण होतें. हुजुरबाजारांबरोबर ७ तारखेचा संपूर्ण दिवस हिंडून काढला.

## ( ३ )

श्री. हुजुरबाजारांबरोबर मी मास्कोची विश्वप्रसिद्ध भूगर्भ रेल्वे पाहिली. हिला 'मेट्रो' म्हणतात. ५० लक्ष वसतीच्या मास्को शहरांतील वहातुकीची गर्दी ह्या रेल्वेमुळें खूप सुसह्य झाली आहे. ही रेल्वे बांध-





अनुक्रमणिका




ण्यास प्रारंभ सन १९२८ च्या सुमारास झाला. तिचा एक भाग १२ किलोमिटर सन १९३५ मध्यें पुरा झाला. व त्यावेळींच वहातुक प्रथम सुरूं झाली. आतापर्यंत ८१ किलोमिटर रस्ता बांधून झाला आहे. मुंबई सारखीच दुहेरी लाईन आहे व ३२ स्टेशनें आहेत. कांहीं स्टेशनांना एस्कॅलेटर म्हणजे चक्राकार फिरते असे १०० पासून २०० पायऱ्यांपर्यंतचे चढते उतरते चव्हेरी जिने आहेत. प्रत्येक स्टेशनची इमारत व चार फ्लाटांवरील सभामंडप वैशिष्ट्यपूर्ण रीतीने बांधलेले आहेत. प्रत्येक स्टेशनची स्थापत्यरचना वेगळी आहे. प्रत्येक स्टेशन संगमरवरी पाषाणांचें घडविलेलें आहे. प्रत्येक स्टेशनच्या आवारांतील स्तंभांवरील, प्राकारांवरील व आढयांवरील नक्षी, खोदकाम आणि चित्रें यांची सजावट भिन्न प्रकारची आहे. संगमरवरी पाषाणाचे शुभ्र, लाल, पिवळे, काळे, हिरवे, जांभळे, काबरे, व संमिश्र असे प्रस्तर वापरून विचित्र रंगसंगति निर्माण केली आहे. उराल पर्वत हा विविध रंगी संगमरवरी पाषाणांचा विशाल व अनंत समुच्चयच आहे, असें म्हणतात कीं, उराल पर्वतांतील संगमरवरी पाषाणांच्या टेकडयाच खणल्या व हनुमानाने द्रोणागिरि आणला त्याप्रमाणे स्टॅलिन व क्रुश्चेवच्या रशियाने त्या आणून स्टेशनचा आकार देऊन उभारल्या आहेत. विशेषतः ह्या रल्वेंतील बराचसा भाग १९४३ ते १९५४ सालापर्यंत बांधून पुरा केला आहे. भूगर्भांत १०० ते २०० फूट खोल जाऊन भूभाराचा धोका नष्ट करण्याकरितां सामर्थ्यशाली पक्के बोगदे व भुयारें मैलोंमैल तयार करण्याचें प्रचंड कार्य दुसऱ्या महायुद्धाच्या मध्यांत केलें हें वाचून माझ्या मनास आश्चर्य वाटलें व धक्काहि बसला. मी तें अद्भुत स्थापत्याचें ऐश्वर्य पाहून पुनः पुनः थक्क होत होतों. परंतु त्या अद्भुत दर्शनाच्या आनन्दांत विषादाचेहि भाव अनावरपणे मिसळत होते. मी मूळचा मार्क्सवादी असल्यामुळें माझी मानवतावादी दृष्टि रमण्याच्या ऐवजीं दुःखाने सचिंत झाली. हे जनतेचे महाल या साम्यवादी राज्यशक्तीने केव्हां निर्माण केले? याचें उत्तर माझ्या मनाला तलवारीप्रमाणें कापत होतें. हिटलरने दोन हजार मैल लांब व एक हजार मैल रुंद एवढा सोव्हिएट देशाचा भाग ज्या युद्धांत जिंकून उध्वस्त केला होता. कोटयवधी सोव्हिएट प्रजाजन घरें, दारें, गांवें, मालमत्ता गुरेढोरें, शेतें, दुकानें, कारखाने यांना सोडून सैरावैरा मागे हटत होते. ५० लाख लष्कर नाझी शत्रूला छातीचा कोट करून टक्कर देत, शिस्तीची माघार घेत होते त्यावेळीं ही बादशाही थाटाची रेल्वे सोव्हिएट राज्यकर्ते बांधून घेत होते. ज्यावेळीं हिटलरच्या सैन्याला बर्लिनपर्यंत पिटाळणें अन् नष्टभ्रष्ट झालेल्या स्वदेशाला स्वतःच्या पायावर उभें करणें, असा प्रचंड प्रश्न दोस्त राष्ट्रें सोडवीत होतीं, अशावेळीं सुलतानांनाहि हेवा वाटविणारीं मास्कोचीं व लेनिनग्राडचीं दिमाखदार रेल्वेचीं स्टेशनें क्रांतिकारक कामगारवर्गाकडून सोव्हिएट राज्यकर्ते उभारित होते. रेल्वेस्टेशनें अशा रंगेल महालांचें रूप देऊन बांधावीं, अशी कल्पना आजच्या भारतांतील लोकशाहीत कोणी मंत्री सांगू लागला तर येथील सर्व पक्ष विशेषतः कम्युनिस्ट त्याची कुतरओढ करतील. रेल्वे स्टेशन ही केवळ उपयोगी वस्तु आहे, हा रंगमहाल नव्हे. विशेषतः अन्नवस्त्राची जेथें अजून तूट आहे.–क्रांतीला ४३ वर्षे झाली तरी अजून तूट आहे–अशा रशियांत असलीं रंगेल स्टेशनें बांधलीं जावींत हें पाहून मला फारच खेद चमत्कार वाटला. सत्ताधारी अखेर आपल्या सत्तेच्या दिमाखास प्राधान्य देतो. मग तो साम्यवादी कां असेना; असा सत्तेच्या राजकारणाचा विषादकारक वास्तववाद रशियांतील मट्रोकडे पाहून पुनः प्रत्ययास आला.

— अपूर्ण

---



अनुक्रमणिका






प्रा. राम जोशी

# तृतीय पंचवार्षिक योजना आणि भाववाढीचा प्रश्न

तृतीय पंचवार्षिक योजनेचा जो आराखडा प्रसिद्ध झाला आहे त्यांत योजनेच्या काळांत भाव-विषयक धोरण काय असेल याचें स्पष्ट दिग्दर्शन नाहीं. जीवनावश्यक वस्तु आणि औद्योगिक कच्चा माल यांच्या सतत चढणाऱ्या किंमती रोखून धरण्यांत आलेलें अपयश हें दुसऱ्या योजनेच्या असफलतेचें एक प्रधान कारण समजलें पाहिजे. वाढत्या किंमतींचा त्या योजनेवर दुहेरी परिणाम झाला. एकीकडे योजनेचा वस्तुरूप आशय कायमच राहिला पण योजनेच्या खर्चांत वाढ झाली आणि दुसरीकडे लक्षावधि लोकांच्या राहणीच्या मानावर अनिष्ट परिणाम झाला. १९५५ ते १९६० या काळांत धान्याच्या किंमती ४२ टक्क्यांनीं व औद्योगिक कच्च्या मालाच्या किंमती ४०·६ टक्क्यांनीं वाढल्या. दुसऱ्या योजनेंतील या घटनेकडे तिसऱ्या योजनेच्या आराखड्यांत लक्ष वेधण्यांत आलें असून 'भविष्यकाळासाठीं त्यापासून धडे घेतां येण्यासारखे आहेत' असा कबुलीजबाब आराखड्यांत देण्यांत आला आहे. आराखडा म्हणतो, "कमी-अधिक प्रमाणांत योजनेच्या पहिल्या चारहि वर्षांत अन्नधान्य, शेतीचा कच्चा माल तसेंच औद्योगिक वस्तु या सर्वांचे भाव सतत वाढत राहिले आहेत. घाऊक किंमतींचा दर्शकांक (१९५२-५३ = १००) पहिल्या योजनेच्या शेवटीं ९९·२ होता. तो दुसऱ्या योजनेच्या दुसऱ्या वर्षी १०६·१ वर चढला. तसाच पुढें चढत चढत १९५८-५९ चे शेवटीं तो ११२·१ पर्यंत गेला व १९५९-६० चे अखेरीस तो ११८·६ वर येऊन धडकला." (तृतीय पंचवार्षिक योजना-एक आराखडा पृ. २२). इतक्या झपाट्यानें वर चढणाऱ्या किंमतींमुळें सामान्य माणसाच्या जीवनमानांत गंभीर स्वरूपाची काटछाट झाली असल्यास व परिणामीं त्याच्या नियोजनावरील विश्वासाला धक्का पोहोंचला असल्यास त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं.

दुसऱ्यां योजनेच्या उपरिनिर्दिष्ट अनुभवामुळें तिसऱ्या योजनेच्या संदर्भांत भावविषयक धोरणाला अनन्यसाधारण महत्व आलें आहे. भावविषयक सुस्पष्ट व गतिमान धोरण आंखल्याशिवाय तिसरी योजना यशस्वी होणें कठीण आहे याची व्यापक प्रमाणांत जाणीव दिसून येत आहे. मात्र ही जाणीव धोरणाच्या गरजेपुरती मर्यादित आहे. भावविषयक धोरणाच्या गरजे-ऐवजीं आपण त्याच्या निश्चित उद्देशांबद्दल किंवा तपशीलाबद्दल बोलूं लागलों कीं मतैक्याचें क्षेत्र संपतें व तीव्र मतभेद दृग्गोचर होऊं लागतात. आणि तसें होणें स्वाभाविक मानलें पाहिजे. कारण विकासाच्या योजनेंत किंमतविषयक धोरणाचें कार्य नेमकें कोणतें हा प्रश्न गुंतागुंतीचा व विवाद्य असतो. खालील विवेचनाचा उद्देश स्पष्ट व लवचिक भावधोरण आंखणें सोपें व्हावें या दृष्टीनें कांहीं सूचना करणें हा आहे. अशा धोरणाला दोन आर्थिक क्रिया कराव्या लागतील; त्या क्रिया म्हणजे (१) लोकांचें जीवनमान स्थिर ठेवणें व (२) उत्पादन-वाढीसाठीं आवश्यक त्या प्रेरणा (incentives) उपलब्ध करणें.

### किंमतींचें कार्य

येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं भावपद्धति अर्थव्यवस्थेंतील एक महत्वाची कारकशक्ति असून तिचा उपयोग नियोजित तसेंच अनियोजित अर्थ-









अनुक्रमणिका

व्यवस्थेंतहि केला जातो. म्हणूनच भावविषयक धोरणाविषयींचा विचार करतांना संबंधित अर्थ-व्यवस्थेंत किंमतींचें कार्य काय आहे याचा विचार होणें अगत्याचें असतें.

अनियोजित अर्थव्यवस्थेंत उत्पादन, विनिमय किंवा भांडवल गुंतवणूक यांविषयींचे निर्णय कोण-त्याहि सामाजिक आदर्शांच्या निकषावर हेतुपूर्वक ठरविलेले नसल्यानें अशा अर्थव्यवस्थेंत भावपद्ध-तिच आर्थिक फायद्याच्या सापेक्षतेची एकमेव निदर्शक असते; व किंमतींच्या अनुषंगानेंच उत्पादनाचें साहस पत्करलेल्या व्यक्ति आपले उत्पादनाचे, उत्पादनपद्धती-संबंधींचे व अन्य निर्णय घेत असतात. वरील विधानां तील ' सापेक्षता ' हा शब्द महत्त्वाचा आहे. कारण अनियोजित अर्थव्यवस्थेंत किंमतींच्या सर्वसाधारण पातळीपेक्षां उत्पादकाच्या दृष्टीनें तो तयार करीत असलेल्या वस्तूची व त्याला लागणारा कच्चा माल वगैरेची ' विशिष्ट ' किंमतच अधिक महत्त्वाची असते.

किंमतींच्या ठिकाणीं फार मोठी वितरक शक्ति असते. भावांच्या चढउतारांमुळें उत्पादन साधनांची आवश्यक तशी हालचाल अर्थव्यवस्थेंत सुरू होते.

भारतासारख्या नियोजित अर्थव्यवस्थेंत किंम-तींचें आणखी एक महत्त्वाचें आर्थिक कार्य असतें. आणि तें म्हणजे भांडवलाच्या गरजेइतकी शिल्लक अर्थव्यवस्थेंत टाकली जाईल याची तरतूद करणें.

## सामान्यतः भाव चढणारच

प्रथमतः विकासप्रधान नियोजनाचें एक महत्त्वाचें वैशिष्ट्य लक्षांत घेतलें पाहिजे. अर्थ-व्यवस्थेचा विकास चालू असलेल्या प्रदीर्घ काळांत वस्तूंच्या किंमतींची प्रवृत्ति वाढीकडे असते असा सर्वसामान्य सिद्धांत समजावयास हरकत नाहीं. स्वयं-प्रेरित विकासाचा टप्पा गांठीपर्यंत ही प्रवृत्ति चालू राहते. एकदां अर्थव्यवस्थेनें ती प्रगतीची पायरी गांठली म्हणजे उत्पादनशक्ति इतक्या विकसित होतात कीं मागणीच्या दबावामुळें भाव चढूं लागले तर उत्पादन चटकन् व विनासायास वाढूं शकतें व अशा रीतीनें पुरवठा वाढला कीं किंमती पुन्हां खालीं येतात व वाजवी पातळीवर स्थिरावतात. परंतु तो स्वयंप्रेरित विकासाचा टप्पा जोंपर्यंत आपण गांठ-लेला नाहीं तोंपर्यंत अर्थव्यवस्थेंत सहेतुक वाढवि-लेल्या भांडवली खर्चाचा अनिवार्य परिणाम भाव वाढण्यांत होणार हें निश्चित् आहे. आणि हा परि-णाम सदैव अनिष्टच मानावा असेंहि नाहीं. भाव-वाढहि तत्वतःच वाईट असते असें मानण्याचें कारण नाहीं. उलट, कांहीं अंशीं किंमती वाढत जाणें हें मागासलेल्या अर्थव्यवस्थेचा जलद विकास करण्याचे दृष्टीनें चांगलें असतें. बऱ्याच आर्थिक अडचणी त्यामुळें दूर होतात. विकासाच्या वेगामुळें आर्थिक चक्रांचें घर्षण वाढतें त्यावर भाववाढ रूपी तेलाचा उपयोग चांगला. जीवनावश्यक वस्तूंचा पुरवठा मागणीच्या मानानें अपुरा असल्यामुळे त्यांच्या किंमती वाढाव्यात हें केवळ स्वाभाविक नसून भांडवलनिर्मितीच्या गरजांशीं चालू खर्चाचा संबंध जोडण्याचे दृष्टीनें आवश्यकहि आहे. म्हणून विशिष्ट वस्तूंच्या किंमतींतील वाढीनें, किंबहुना कांहीं मर्यादे-पर्यंत सर्वसाधारण किंमतींतहि होणाऱ्या वाढीनें चिंताग्रस्त होण्याचें कारण नाहीं. भाववाढ ठराविक वस्तूंच्या किंमतींत होत असेल तर त्यांना मागणी अधिक आहे हें सिद्ध होतें. किंमतवाढीमुळें आव-श्यक तितकीं उत्पादनसाधनें तिकडे खेंचली जातील व पुन्हां कांहीं काळानंतर उत्पादन, मागणी व किंमत यांचा समतोल साधला जाईल. जर भाववाढ सर्व-साधारण स्वरूपाची असेल तर त्याचा अर्थ अर्थव्यव-स्थेंत असलेल्या फाजील क्रयशक्तीचा दबाव केवळ मागणीवर न पडतां भाववाढीच्या मार्गानें एकप्रका-रची सक्तीची बचत ( involuntary savings ) होत आहे व भांडवलनिर्मितीसाठीं ती आवश्यक आहे. मात्र येथें अशी काळजी घेतली पाहिजे कीं



अनुक्रमणिका






भाववाढीचा परिणाम मागणी संयमित होण्यांत व उत्पादन वाढण्यांत झाला पाहिजे.

### कटु सत्य

वरील विवेचनाचा स्पष्ट अर्थ असा कीं भाववाढ इष्ट कीं अनिष्ट यासंबंधीं मत व्यक्त करण्यापूर्वी किंमती व उत्पादन यांचा अन्योन्य संबंध विचारांत घेतला गेला पाहिजे. विकास पावत असलेल्या अर्थव्यवस्थेंत किंमती स्थिर असाव्यात; अचल असू नयेत. मुळींच न हलणाऱ्या किंमती विकासाच्या पायांतील बेड्या बनतील. हें कटु सत्य लक्षांत आणून देण्याची सध्यां फार आवश्यकता आहे. सगळीकडे भाववाढ रोखण्याच्या घोषणा ऐकूं येत आहेत. नियोजनावरील अवाढव्य खर्चामुळे जेथें द्रव्यरूप मिळकत वाढत आहे तेथें किंमती स्थिर ठेवण्यासाठीं उत्पादनवाढीखेरीज दुसरा उपाय नाहीं व उत्पादवाढीसाठीं पुरेशी प्रेरणा राहावी म्हणून किंमती वाढवून देणें आवश्यक ठरण्याचा संभव आहे, असें हें दुष्टवर्तुळ आहे. म्हणून भाववाढ रोखली जाईल अशीं आश्वासनें देऊन जनतेच्या मनांत खोट्या आशा निर्माण करण्यापेक्षां भाववाढ पूर्णतः आवरतां येणार नाहीं असें स्पष्टपणें सांगणें अधिक चांगलें. याचा अर्थ सरकारनें भाववाढ भरमसाट होऊं द्यावी किंवा जीवनावश्यक वस्तूंच्या किंमतीदेखील कांहीं प्रमाणांत स्थिर ठेवूं नयेत असा घेतला जातां कामा नये.

जीवनावश्यक वस्तूंच्या किंमती स्थिर ठेवण्याच्या धोरणांत उत्पादक आणि ग्राहक अशा दोन्ही वर्गांचे हितसंबंध लक्षांत ठेवले पाहिजेत व त्यांचा समतोल सांभाळला गेला पाहिजे. संघटित व बोलक्या शहरवासीयांना खूष करण्यासाठीं योजनाकारांनीं सर्व लक्ष भाव उतरविण्यावर केंद्रित केलें तर अशी वेळ येण्याचा संभव आहे कीं प्राथमिक उत्पादक (शेतकरी) किंमती घसरल्याची तक्रार करूं लागेल व त्या चढवून देण्याची मागणी करूं लागेल. दोन्ही टोकांचे परिणाम टाळणें आवश्यक आहे. त्यासाठी कांहीं सूचना पुढें करीत आहोंत.

---





अनुक्रमणिका







( १ ) तिसऱ्या पंचवार्षिक योजनेचा अविभाज्य घटक म्हणून कार्य करणाऱ्या भावविषयक धोरणाचें जाहीर उद्दिष्ट फक्त जीवनावश्यक वस्तूंच्याच किंमती स्थिर ठेवण्याचें असलें पाहिजे. आणि त्यांतहि सध्यांचें जीवनमान टिकवून धरण्याचा हेतु असला पाहिजे. अन्नधान्य, कापड, साखर यांवर वाढता खर्च ज्यांना करावयाचा असेल त्यांना अर्थातच् अधिक किंमत द्यावी लागेल. व्यवहारांत या धोरणाचें स्वरूप असें असेल.

( अ ) मर्यादित प्रमाणांत वांटप. या वांटपपद्धतींत ठराविक वस्तू, ठराविक मर्यादेपर्यंत स्थिर किंमतीला मिळतील.

( ब ) खुल्या बाजारांत या वस्तूंची खरेदी करतां येईल. मात्र त्यासाठीं अधिक किंमत द्यावी लागेल.

अशा धोरणाचे दोन फायदे होतील. एक म्हणजे प्रत्येकाला कमी किंमतींत जीवनावश्यक वस्तूंचा ठराविक सांठा मिळण्याची हमी घेतली जाईल. दुसरा फायदा असा कीं ज्यांच्यापाशीं अधिक क्रयशक्ति आहे त्यांना जास्त किंमत देऊन उच्च जीवनमान ठेवतां येईल व त्यायोगें उत्पादनवाढीला प्रेरणा मिळेल.

( २ ) सरकारी यंत्रणेमार्फत वर्षभर धान्याची खरेदी-विक्री केली जावी. त्यायोगें किंमतींत हंगामी चढउतार होणार नाहींत. थोडक्यांत म्हणजे सरकारनें उत्पादकाला त्याच्या मालाची योग्य किंमत मिळेल याची हमी घ्यावी. त्याचप्रमाणें शेतकऱ्याला कारखानदारी माल वाजवी किंमतीला मिळेल याचीहि तरतूद सरकारनें केली पाहिजे.

( ३ ) भावविषयक धोरण योग्य रीतीनें चालविण्यासाठीं आवश्यक तो सांठा सरकारी गुदामांतून करण्यांत आला पाहिजे.

( ४ ) अन्नधान्याचा व्यापार सरकारनें हातीं घ्यावा व वितरणाच्या कामीं सहकारी ग्राहक संस्थांची मदत घ्यावी.

आयात निर्बंध व मोठ्या प्रमाणावर अंतर्गत विकासावर खर्च यांचा परिणाम व्यापारी वर्गाला अभूतपूर्व नफा मिळण्यांत येतो. किंबहुना जलद औद्योगीकरणामुळें राष्ट्रीय संपत्तींतील नफ्याचें प्रमाण इतर मिळकतींपेक्षां अधिक वाढतें असा अनुभव आहे. राष्ट्रीय प्रयत्नांचा फायदा एका वर्गाला मिळूं न देणें हें कोणत्याहि वाजवी नियोजनाचें उद्दिष्ट असलें पाहिजे. मग जेथें 'समाजवादी समाजरचनेचें' उद्दिष्ट अधिकृतरीत्या अंगिकारलें गेलें आहे तेथें तर नफ्याच्या रूपानें व्यक्तींच्या वा वर्गांच्या हातांत जमा होणारी राष्ट्रीय संपत्ति शासनसंस्थेच्या हातीं खर्चासाठीं येणें अत्यंत जरुरीचें नाहीं काय ? म्हणून प्रत्यक्ष करांच्या द्वारा जितका पैसा उभा करतां येईल तितका केला तर नजरेंत भरणारें मूठभर लोकांचें जीवनमान नियंत्रित करतां येईल व चलनवाढीच्या मार्गानें पैसा उभा करण्याची गरज कमी होईल. चलनवाढ कमी करावी लागली तर अर्थव्यवस्थेंतील मोठें दडपण कमी होईल व किंमती ऊर्ध्वगामी भ्रमण करणार नाहींत.

भावविषयक धोरण उत्पादनाच्या गळयांतील लोढणें न बनतां उत्पादनामागील प्रेरकशक्ति बनायची असेल तर वर सुचविलेल्या सूचना अंमलांत आणल्या गेल्या पाहिजेत.

---



अनुक्रमणिका






प्रा. सुमंत मुरंजन

# योजनाबद्ध विकासाची तात्त्विक पार्श्वभूमि

भारतीय योजनाविकासाचीं दोन पंचकें उलटलीं आहेत. तिसऱ्या पंचकाच्या उंबरठ्यावर भारताने पाय ठेवला आहे. गेल्या दशकांत सुखकारक व दुःखकारक बरेच अनुभव जनतेच्या वांट्यास आले. दुःखकारक अनुभवांच्या यादींत प्रामुख्यानें वाढते भाव, आयात-निर्यातींची तोंडमिळवणीची अडचण व परदेशी नाण्यांची भयंकर चणचण, कधींच संपुष्टांत न येणारी बे-रोजगारी यांचा अंतर्भाव केला पाहिजे. उत्तेजन-कारक अनुभव म्हणजे वाढती भांडवलगुंतवणी, वाढतें उत्पादन व प्राप्ती हीं होत. परंतु खेदाची व आश्चर्याची गोष्ट अशी कीं अनुकूल घटनांनीं जनतेंत उत्साह पसरला नाहीं कीं प्रतिकूल घटनांनी – सुदैवानें – विशेष तीव्रतेचा लोकप्रक्षोभ उठला नाहीं. यांस अनेक कारणें देतां येतील. राजकारणाच्या नगाऱ्यापुढें जनतेच्या दैनंदिन जीवनाच्या टिमकीचें काय महत्त्व ? कदाचित् अज्ञानी व निरक्षर जनतेस काय चाललें आहे याची वास्तपुस्त देखील नसेल. परंतु तसें म्हटलें तर साक्षर व ज्ञानसंपन्न लोक तरी किती जागरूकपणा दाखवितात ? कदाचित् शतकेंच्या शतकें जमलेलें जाड्य व औदासिन्य नष्ट करणें वाटतें तितकें सोपें नाहीं; असेंहि सुचविण्यासारखें आहे कीं योजना-विकासाच्या पुरस्कर्त्यांचाच हा दोष असणें शक्य आहे. त्यांनीं भारतीय योजनांचें उद्दिष्ट किती मूलग्राही व दूरगामी आहे तें जनतेस पटविण्याचा कांहींच प्रयत्न केलेला नाहीं. योजनांचा डाळरोटीशी संबंध आहे हें पटविण्यास अर्थ-शास्त्रज्ञ किंवा राजकीय पुढारी लागत नाहीं. तेवढें ज्ञान सर्वांस उपजत असतेंच. परंतु डाळ व रोटीच्या आश्वासनानें उत्साहाची व जागृतीचीच लाट उसळेलच असें गृहीत धरणें निर्धोक नाहीं. उत्साहाची आणि नव-चैतन्याची लाट पसरण्यापेक्षां बुभुक्षितवृत्ति जास्त तीव्र होण्याचा तेवढाच संभव आहे. सत्य असें आहे कीं योजनाविकास म्हणजे डाळ व रोटीची नुसती मुबलकता नसून हिंदी नैतिक व सामाजिक मूल्यांची परिणा-मतः ती मोठी क्रांति आहे. योजनाविकासाचीं ध्येयें जर प्रत्यक्ष सृष्टींत उतरलीं तर ज्या चुकींच्या नीति-मूल्यानें भारताचा अपकर्ष झाला व जनता दारिद्र्यांत खितपत पडली तीं सर्व मूल्यें रसातळास जाणार आहेत व गेलीं पाहिजेत.

आज सहस्रावधी वर्षें भारतीयांची मनोभूमिका निदान वैचारिक पातळीवर जगाविषयीं व जीवना-विषयीं उदासीनत्व नव्हे तर उपेक्षापूर्ण होती. ऋग्वेदाच्या अगदीं प्रगतकाली अशी स्थिति नसावी असें वाटतें. पहिल्या प्रथम सर्व विश्व हें ब्रह्ममय व माणूस म्हणजे अग्नीपासून ठिणगी उडावी तशी एक ब्रह्माची ज्योत एवढीच भावना होती. मृत्यु झाला म्हणजे ज्या ब्रह्मापासून आत्मा निघाला त्या ब्रह्मांत पुनः विलीन होतो असा क्रम मांडलेला दिसतो. जन्मापासून मरणापर्यंत माणसाने काय केलें किंवा केलें नाहीं याचा ह्या विश्वाच्या राहा-टीशी कांहींच संबंध नव्हता म्हणजे या तत्त्वज्ञानांत नीतिशास्त्रांचा कांहींच संभव नव्हता. ही विचार-सरणी विशेषकाल टिकली नाहीं. ( जवळ जवळ न कळत ) पुनर्जन्माचें चक्र आणि कर्मविपाकाचा नियम यानी भारतीय मनोविश्वांत प्रवेश केलेला दिसतो. भारतीय मन या भयानक कल्पनांच्या इतकें आहारीं गेलें कीं तेव्हांपासून जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्तता एवढाच जीविताचा विषय झाला. ही मुक्तता जगाची नसून प्रत्येकानें स्वतःची स्वतःकरतांच साधावयाची असते हें तत्त्व अपरिहार्यतः प्रबळ झालें. ब्रह्माचें ज्ञान झालें म्हणजे भार्या, पुत्र, संपत्ति, समाज यांचाशी संबंध काय ?

जन धर्म वैदिकधर्मपूर्वच असावा. महावीरानें पुन-र्जन्म आणि कर्मवाद या दोहोंचा स्वीकार केला व जग आणि जीवनाची उपेक्षा अधिक तीव्र केली. सर्व प्राणिमात्राविषयीं अहिंसा बुद्धि असावी असा त्याचा आग्रह होता. परंतु ही अहिंसावृत्ति प्राणिमात्रांचें








कल्याण व्हावें व प्रत्यक्ष कल्याण करावें अशी नव्हती. तर व्यक्तीचा आत्मा दूषित होऊं नये व त्यानें जन्म-मरणाच्या फेऱ्यांत राहूं नये म्हणून होती. आत्मा जडसृष्टीचा म्हणजे शरीराचा कैदी असून दूषित झालेला आहे. म्हणून उपास-तापास, व्रतें उद्यापनें यानीं जडतत्वास नामोहरम करून मुक्ति मिळवायची आहे. असल्या जीवनदृष्टींत लोककल्याणकरी नीतिशास्त्राचा संभव असणें तिळमात्र शक्य नव्हतें.

बुद्धानें अहिंसेचें मानवताप्रेमांत रूपांतर करण्याचा पहिला मोठा उपक्रम केला. मानवताप्रेमाचीं बुद्धाचीं सर्व सूक्तें भव्य व उदात्त आहेत. त्यानें ब्रह्म आणि आत्मा या कल्पनांचा त्याग केला. परंतु बुद्धाचेंहि तत्त्वज्ञान असें होतें कीं सामाजिक परिस्थिति आणि वातावरण प्रयत्नत: बदलावें व बदललें पाहिजे असा आदेश त्यांतून निघत नव्हता. तृष्णा, इच्छाशक्ति वा व्यक्तिमत्त्व हें नष्ट केलें तरच दुःखाचें कारण जाऊन निर्वाणाचा मार्ग मोकळा होणार होता. तेव्हां जीवन जर आरंभापासून शेवटपर्यंत दुःखमयच आहे तर सामाजिक व भौतिक वातावरण सुधारून मूल समस्या कशी सुटणार ?

वैदिक व औपनिषदीय तत्त्वज्ञान, जैन धर्म व बुद्ध धर्म यांच्या समकालीन असलेल्या शिव, विष्णु, रुद्र, कृष्ण वगैरे देवतोद्भव भक्तिमार्ग कसा वाढत गेला हेंहि एक इतिहासाचें कोडें आहे. सर्वसाधारण जनतेंत त्यांचा पूर्वीपासूनच प्रसार असावा. पुढें बुद्धधर्माचा वाढता जोर पाहून जुन्या हिंदु धर्माच्या पुरस्कर्त्यानीं हे सर्वच ब्रह्माचेच अवतार म्हणून त्यास द्वारें उघडीं केलेलीं दिसतात. ईश्वरास शरण जाऊन भक्तिपूर्वक प्रत्येक कर्म करावें म्हणजे मुक्तिद्वार खुलें होतें हें नीतिशास्त्र त्यांतून उद्भवलें व हिंदुधर्मास नीतीचें अधिष्ठान प्राप्त झालें खास. दैनंदिन व्यवहार हा भक्तीचाच मार्ग ही वैचारिक क्रांतीच होती व तुकाराम ज्ञानेश्वरांत या मार्गाचा कळस झाला. परंतु शेवटी या मार्गालाहि संसारत्यागाची कलाटणी मिळालीच.

आपल्या पंचवार्षिक योजनांचा विकास म्हणजे आजपर्यंत उराशी जोपासलेली जगाविषयी आणि जीवनाविषयीं औदासिन्य व उपेक्षा यांचा परिपूर्णतः त्यागच होय. मानुषी जीवनास मूलतःच नैतिक मूल्य आहे व त्याची वृद्धी करणें हें आपलें कर्तव्य आहे. यावरच पंचवार्षिक योजनांची उभारणी आहे. उपनिषदास त्यांचें आव्हान आहे तें असें: आत्म्यास म्हणजे पर्यायानें स्वतःसच ब्रह्माच्या पातळीवर नेलें व त्यांच्या एकत्वाचें ज्ञान झालें म्हणून भार्येस, पुत्रास, समाजास, सामाजिक कल्याणास पारखें होण्याचें कारण नाहीं. जैनधर्मास त्यांचें आव्हान आहे तें असें: समाजांतील प्रत्येक व्यक्तीनें पार्थिव जीवन समृद्ध आणि सुखावह करण्याचा सांघिक प्रयत्न केला तर त्यानें कोणाचाहि आत्मा दूषित होत नाहीं. बुद्धधर्मास योजनांचें आव्हान आहे तें असें: तृष्णा अथवा व्यक्तिमत्त्व हा अवहेलना करण्याचा विषय नसून बुद्धानेंच सांगितलेल्या अष्टविध मार्गासारख्या जीवनक्रमाचें अवलंबन करून व्यक्तिमत्त्वाची पातळी उंचावून जीवन समृद्ध करण्यानें बऱ्याच दुःखांचा परिहार करणें मनुष्याच्या आवाक्यांत आहे. योजना पुरस्कर्त्यांचा दावा आहे कीं जन्मजात कर्तव्यांचा आणि आधुनिक जीवनांचा काडीमात्र संबंध उरलेला नाहीं. संदेहात्मक प्रसंगीं जन्मजात कर्तव्यें निष्काम बुद्धीनें करावीं हें नीतिशास्त्र निरुपयोगी व टाकाऊ आहे. कर्माच्या सात्विक गुणास कर्मबुद्धीच्या खालीं लेखणें म्हणजे सत् व असत् याची परवा नाहीं व सुदुराचारी आणि सदाचारी सारखेच असें सांगण्यासारखें आहे. योजनाविकास म्हणजे दारिद्र्याचा निरास व दारिद्र्याचा निरास म्हणजे समाजांतील बऱ्याच असत् प्रवृत्तींचा नायनाट होय.

दुसरें म्हणजे योजना-विकासाचें असें प्रस्थानतत्व आहे कीं सामाजिक व व्यक्तिगत दारिद्र्य हें महात्मतेचें चिन्ह नाहीं. दारिद्र्यानें शंभरापैकीं नव्याण्णव व्यक्तींच्या गुणांची माती होऊन जीवनाच्या सात्विक व उदात्त अनुभवास ते मुकतात. या श्रद्धेवरच योजना-विकासाची उभारणी आहे. यापेक्षांहि महत्वाचें तत्व म्हणजे सामाजिक व वैयक्तिक दारिद्र्य अपरिहार्य नसून तें बऱ्याच प्रमाणांत सामाजिक दोषांनें उद्भवलेलें असतें व सांघिक प्रयत्नानीं व संघटनेने त्याचा निरास करतां येतो. म्हणजे आर्थिक जीवन हें जीवनाचा ८०–९० टक्के तरी भाग असेल तर तेवढ्यापुरतें तरी पुनर्जन्म आणि कर्मविपाक हीं कांहीं वर्गानीं इतरवर्गांच्या पिळवणुकीकरता निर्माण केलेलीं थोतांडेंच ठरतात. युगानुयुगें चालू असलेल्या क्रूर







व अनीतिमय नागवणुकीस पुनर्जन्म आणि कर्मविपाक जबाबदार नाहींत अथवा अल्ला आणि किस्मत हीं जबाबदार नाहींत. तसें नसतें तर पं. जवाहरलाल व त्यांचे सहकारी यांनीं विकासयोजना गुंडाळलल्याच बऱ्या. ज्यांचें संचितकर्म चांगलें ते इंग्लंडांत वा अमेरिकेंत जन्मतील व इतर दरिद्री भारताच्या वांट्यास येतील.

तिसरी गोष्ट अशी कीं भारतीय विकासयोजना समाजवादी आर्थिक व्यवस्था प्रस्थापित करण्याकरितां आंखलेल्या आहेत. समाजवादी आर्थिक व्यवस्था म्हणजेच आर्थिक स्थिति व जीवनाचें एकंदर वातावरण याविषयीं अधिकाधिक समता होय. ही समता भारतांतील प्रमुख घटक जो हिंदुसमाज त्याच्या आजपयतच्या प्रथेशीं व तत्वज्ञानाशीं आमूलाग्र विसंवादी आहे. हिटलर व गेब्बल्स यांनीं फक्त दहा वर्षेंच यहूदी लोकांच्या विरुद्ध प्रचार करून त्यांना माणुससमाजबाह्य करण्याचा भयानक उपक्रम केला. परंतु भारतांत आज शतकानुशतकें असमतेचा प्रचार झालेला असून माणसांचे समाजच्या समाज अनिर्वाच्य स्थितीत खितपत जगत आहेत. आमच्या धर्मशास्त्राप्रमाणें भारतांतील दहा ते वीस टक्के माणसें चालतीं बोलतीं स्मशानें होत. स्त्रिया, वैश्य व शूद्र पापयोनी * ठरतात. माणसाच्या जीवनाची अशी महत्त्वाची अथवा क्षुल्लक बाबत नाहीं कीं त्याविषयीं आम्ही असमतेचा प्रचार केलेला नाहीं. आणि याला सर्व आधार कसला तर पुनर्जन्म व कर्मविपाक! संचित कर्म आणि प्रारब्धकर्म! हिटलर व गेब्ल्स याना राक्षसयोनीत घालूं इच्छिणाऱ्यांनी आपण स्वतः सहस्रावधी वर्षें कोणत्या नीतिशास्त्राचा प्रचार केला आहे व त्या प्रचाराच्या जोरावर इतरास धनदारास पारखें केलें आहे तें पाहिलेलें बरें. पंचवार्षिक योजनांचा स्वीकार म्हणजे या सर्व पुरातन व रानटी कल्पनांचा व त्यावर रचलेल्या पुरातन व रानटी समाजव्यवस्थेचा धिक्कार व त्याग होय.

सारांश पंचवार्षिक योजना म्हणजे केवळ कोट्यावधी रुपयांची भांडवल गुंतवणी व अद्यावत् उत्पादन नाहीं. त्या करतां माणसानी श्रद्धेने कार्यास लागलें पाहिजे. अशी श्रद्धा फक्त नैतिक जागृतीनेच निर्माण करणें शक्य आहे. या नैतिक जागृतीची पहिली पायरी म्हणजे आज तागायत धर्माच्या आणि अध्यात्माच्या नांवावर ज्या कल्पनांचा प्रचार केला त्यांची प्रामाणिकपणें समीक्षा करून ज्या कल्पना मानवताविघातक ठरतात त्यांचा जाहीरपणें त्याग करणें होय. असें केल्यानेच नवीन युगाला जुळणाऱ्या अशा नैतिक मूल्यांचा स्वीकार करण्याचा मार्ग मोकळा होणार आहे. असल्या नवीन जीवनदृष्टीने जी नैतिक श्रद्धा उत्पन्न होईल त्या नैतिक श्रद्धेच्या जोरावरच पंचवार्षिक योजना पार पडणार आहेत.

---

* याबद्दल लोकमान्य टिळकांनीं केलेली शब्दाची कसरत प्रेक्षणीयच आहे. ज्या भाषेत संधिविग्रह निराळा करून एकच ग्रंथ रामायण वा महाभारत म्हणून वाचतां येतो त्यांत हा प्रकार ठीकच आहे!



अनुक्रमणिका

प्रा. कृ. व्यं. पेशकार व प्रा. रामदास डांगे

# ' मराठी निबंध – उद्‌गम आणि स्वरूप '

[ ' देशीकार लेणें ' या प्रा. कृ. व्यं. पेशकार व प्रा. रामदास डांगे यांनी संपादिलेल्या निबंध संग्रहाच्या ' प्रस्तावनेंतून ' उद्‌धृत. ]

मराठी निबंधाचा जन्म केव्हा व कसा झाला ह्याचा शोध घेऊं लागलें तर ह्यासंबंधीं विविध मतें मांडलीं गेलीं आहेत असें दिसतें. डॉ. मा. गो. देशमुख ह्यांनी ' मराठी निबंधाची पूर्वपीठिका ' दाखवितांना असें म्हटलें आहे– " मराठीं निबंधकारांचा पिंड केवळ ललित वाङ्‌मय निर्माण करणाऱ्या कलावंताचा नसून रचनाबद्ध, वस्तुनिष्ठ व कसलेल्या शैलीने आपले विचार व्यक्त करणाऱ्या साहित्याचार्यांचा आहे......खुद्द निबंध या शब्दाची मूळ पीठिका हीच गोष्ट सिद्ध करील. हा शब्द मूळ संस्कृतांतील. त्याचा धात्वर्थ ( निबध्यते अस्मिन् इति नि+बन्ध्+ ल्युट्, अधिकरणे निबन्धनम् ) म्हणजे ' जींत विषय गोवला जातो अशी रचना ' असा आहे. "

## ' निबंध ' नामकरणाचें मूळ

इथपर्यंतचें त्याचें विवेचन संपूर्णपणें पटण्यासारखें आहे. पण पुढे मराठी निबंधाची जन्मकथा सांगतांना त्यांनी असा निष्कर्ष काढला आहे कीं– " आजच्या मराठी निबंधाचें मूळ आपणांस बहुतांशी संस्कृतां-तील निबंधांत आणि संस्कृत दर्शनांतील अधि-करणांत सापडतें. " ह्या म्हणण्याला पुरावा देतांना ' वासवदत्ता ' ह्या गद्यकथेचा कर्ता सुबन्धु ह्याने वासवदत्तेच्या प्रस्तावनेंत शेवटीं ' निबन्ध ' हा शब्द वापरला आहे असें दाखवून सुविख्यात बाणाच्या ' कांदबरी ' वरून आजच्या मराठींत ' कांदबरी ' हा नवलकथावाचक सर्वसामान्य शब्द रूढ झाला. त्याचप्रमाणें दुसरा एक सुविख्यात गद्यलेखक सुबन्धु ह्याच्या ' निबंधा ' वरून एका निराळ्याच वाङ्‌मयप्रकारासाठी ' निबंध ' हा शब्द रूढ झालेला दिसतो हा योगायोग मोठा ' कुतूहलजनक ' आहे असें म्हटलें आहे. हें विवेचन ' कुतूहलजनक ' आहे ह्यांत शंकाच नाहीं पण तें ' सत्य ' नाहीं. कारण कोणत्याहि वस्तूचें नामकरण करतांना मनाची जी प्रक्रिया होते तिच्याकडे दुर्लक्ष झाल्यामुळें अशी चूक होते. पूर्वज्ञानाशी संबंध जोडूनच नव्या ज्ञानाचें ग्रहण मानवी मन करीत असतें. म्हणून या नवीन वाङ्‌मयप्रकाराला नांव देतांना त्या शब्दाच्या धात्वर्था-कडेच लक्ष पुरविलें गेलें असलें पाहिजे. कारण सुबन्धूने ज्या प्रकारच्या लेखनाला ' निबन्ध ' या नांवानें संबोधिलें आहे त्याच्या व आधुनिक काळांत ज्याला हें नांव दिलेलें आढळतें त्याच्या स्वभाव-धर्मांत एकरूपता नाहीं. तसेंच प्राचीन भारतीय दर्शनांतील ' अधिकरण ' व ' आधुनिक निबंध ' ह्यांत ' साधकबाधक प्रमाणें देऊन विशिष्ट मनाचें प्रतिपादन करणें ' हें साधर्म्य असलें तरी ' दर्शन-ग्रंथ ' हे शुद्ध शास्त्रीय ग्रंथ असल्याने त्यांत ' तर्क-शुद्धता ' ही एकमेव कसोटी गृहीत धरलेली असते; तर निबंध हा ' लालित्याचीहि ' बूज राखणारा अस-ल्यानें, त्यांचें गोत्र जमत नाही हेंच खरें !

वस्तुस्थिति अशी दिसते की, " इंग्रजी राज्य व इंग्रजी शिक्षण महाराष्ट्रांत सुप्रतिष्ठित झाल्यानंतर मराठी गद्याच्या विकासाला प्रारंभ झाला. इ. स. १८१८ पासून १८७४ पर्यंत छत्रे, महाजन, गुंजीकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर, लोकहितवादी इत्यादि कितीतरी पंडितांनी पोटतिडिकीने, भाषे-विषयींच्या निस्सीम प्रेमाने आणि समाजाची सर्वां-गीण सुधारणा व्हावी ह्या तळमळीने–या अर्धशत-कांत विविध व विपुल गद्यलेखन केलें. ह्या काळां-तल्या त्यांच्या लेखांनी ' निबंध ' ह्या वाङ्मयप्रकाराची










पायाभरणी केली असें स्थूलमानाने म्हणतां येईल" हें श्री. वि. स. खांडेकर ह्यांचें प्रतिपादन स्वीकरणीय आहे.

पण एवढें म्हणून श्री. खांडेकर ह्यांचें समाधान होत नाही. ते पुढे म्हणतात, 'प्राचीन मराठी वाङ्मयांत ह्या पद्धतीचें लेखन नव्हतें हें खरें आहे. पण अशा प्रकारच्या लेखनाचें नीटनेटकें व ठसठशीत बाह्यरूप जुन्या वाङ्मयांत दृग्गोचर होत नसलें तरी त्याचा आत्मा ह्या नाही त्या रूपाने त्या काळांतहि प्रगट होत असेच. अध्यात्म हा संतकवींचा कितीहि आवडता विषय असला तरी आणि रामायण–महाभारतांतील कथा अलंकारयुक्त शैलीने वर्णन करण्यांत पंडितकवि कितीहि रंगून गेले असले तरी, निबंधलेखनाचें जें एक मुख्य कार्य समाजाला निद्रेतून जागें करणें, जीवनांतल्या मूल्यांचा निर्भय आणि प्रामाणिक दृष्टीने विचार करायला त्याला शिकविणें, जें असत् आणि अमंगल आहे त्याच्यावर तर्कशुद्ध प्रहार करणें, जें सत् आणि मंगल आहे त्याचा सावेश पुरस्कार करणें,—तें त्यांची वाणीहि अधून मधून केल्याशिवाय राहत नसे.'

"तो काळ पद्याचा होता, ऐहिकापेक्षा पारमार्थिकाला महत्त्व देणारा होता. अशा परिस्थितींत निबंधकाराचा आत्मा सुस्पष्ट रीतीने प्रगट होणें कठिण होतें. तथापि रामदासाची कविता—विशेषतः दासबोध—वाचणारा प्राचीन मराठी वाङ्मयाला निबंधकाराची वृत्ति अपरिचित होती असें कधींच म्हणणार नाहीं."

वरील दोन परिच्छेदांतील विवेचन अभिनिवेशयुक्त आहे. तर्कसंगत नाही. तिथे निबंधाचा आत्मा, त्याची वृत्ति व त्याचा बाह्यवेश ह्यामध्यें फरक करून बाह्यवेश नसला तरी आत्मा जुन्या मराठींत होता असें दाखविण्याचा अट्टाहास केलेला दिसतो. विशेषतः प्रथम परिच्छेदांत जें निबंधाचें एक मुख्य कार्य म्हणून निवेदन केलें गेलें आहे; तें तर अतिरंजित आहे. एका अर्थाने तें सर्व प्रकारच्या साहित्याचेंच कार्य नाही काय? त्या वर्णनांत केलेलें कार्य मराठींतील एका विशिष्ट कालखंडांतील निबंधाने केलें असेल; पण तें त्याचें व्यवच्छेदक लक्षण मानतां येईल काय? तशीच स्थिति रामदासांच्या दासबोधाचें वर्णन करतांना झाली आहे. निबंधाचा आत्मा व त्याचा बाह्यवेश हीं भिन्न आहेत काय? "जेव्हां एखादा नवा विचार लेखकाला सांगावयाचा असतो, तेव्हां त्या नव्या विचाराच्या प्रकटीकरणाला शक्यतों नवें माध्यम तो निर्माण करीत असतो." हें श्री. अ. ह. लिमये ह्यांचेंच विधान खरें वाटतें.

डॉ. मा. गो. देशमुख काय अगर श्री. वि. स. खांडेकर काय, ह्यांना मराठी निबंधाचें मूळ प्राचीन काळांत शोधण्याचें एवढें अगत्य कां वाटतें हें कळत नाही. ह्या हौसेमुळें त्यांनीं ऐतिहासिक सत्याकडे डोळेझांक केली आहे.

### राष्ट्रीय वृत्तपत्रकार हे निबंधकार

वस्तुतः "आधुनिक मराठी वाङ्मयाच्या सर्वांगीण विकासाला मराठी नियतकालिकांनी अव्वल दर्जाचें साहाय्य केलेलें आहे. इंग्रजपूर्व काळांत अभावानेच जाणवणाऱ्या मराठी गद्याचें इंग्रजी अमदानींत नियतकालिकांनीच उत्तम पोषण केलेलें आहे. इंग्रजी वाङ्मयाच्या परिचयानंतर आधुनिक मराठींत रूढ झालेले निबंध, लघुकथा, कादंबरी, कविता इ. वाङ्मयप्रकार प्रथम मराठी नियतकालिकांतच प्रसिद्ध होऊन मान्यता पावलेले आहेत. इंग्रजी संस्कृतीच्या संपर्कानंतर महाराष्ट्राचें जीवन सारखें बदलत गेलें. ह्या बदलत्या जीवनाचें प्रतिबिंब स्पष्टपणें मराठी नियतकालिकांतूनच उमटलें. ह्या बदलत्या जीवनाच्या निदर्शक असलेल्या विकार-विचारांना मराठी नियतकालिकांनीच प्रथम बोलकें केलें." हें डॉ. अ. ना. देशपांडे यांचें विवेचन पूर्णपणें सत्यास धरून आहे.







" मराठींतील निबंध-वाङ्मयाला खरी सुरुवात इंग्रजी राजवटींतच झाली हेंच विधान शेवटीं सर्व-मान्य होईल. असें श्री. वि. ह. कुळकर्णी ह्यांनीहि 'प्रदक्षिणें' तील आपल्या लेखांत प्रतिपादन केलें आहे.

ऐतिहासिक दृष्टीने विचार केल्यास " राष्ट्रीय वृत्तपत्रसृष्टीचे निर्माते हेच आधुनिक मराठींतले प्रभावी निबंधकार ठरले. प्रथम पत्रकार आणि नंतर पत्रलेखनाच्या माध्यमांतून निबंधकार बनलेल्या टिळक, आगरकर, परांजपे ह्या साहित्याला समा-जोन्नतीचें एक साधन मानणाऱ्या तिघा ध्येयदर्शी लोकशिक्षकांनी, चिपळूणकरांनी साक्षेपशील कौश-ल्याने तयार केलेल्या सुंदर व मजबूत चौथऱ्या-वर मराठी निबंधाचें भव्य मंदिर उभारावयास सुरु-वात केली."

" चिपळूणकर हेच आधुनिक मराठींतल्या रचना-सौष्ठवाने युक्त असलेल्या प्रौढ आणि प्रतिष्ठित निबं-धाचे आद्य निर्माते आहेत. त्यांनी हा वाङ्मयप्रकार इंग्रजींतूनच घेतलेला आहे. त्यांच्या हातीं मराठी निबंधाला एकाच वेळीं रम्य आणि गंभीर, रंजक आणि उद्बोधक, भावनोत्तेजक आणि विचारप्रवर्तक, डौलदार आणि भरदार, वेधक आणि वजनदार असें स्वरूप प्राप्त झालें. निबंधाचें वाङ्मयीन सौंदर्याचें जें अंग त्याची जाणीव कायम ठेवून तें जास्तींत जास्त सजविण्याचे प्रयत्न त्यांनी केले."

## निबंध व लघुनिबंध

वरील विवेचनावरून निबंधाचा जन्म कसा व केव्हां झाला एवढेंच ध्यानांत येईल असें नसून निबंधाचीं लक्षणें कोणतीं ह्याचाहि बोध होईल अशी अपेक्षा आहे. निबंध म्हणजे 'कोणत्याहि विषया-वरील विचारांची सुसूत्र मांडणी' असें म्हटल्याने त्याच्या अंतरंगाचा बोध होतो. पण एवढीच कल्पना केल्यास ती अपुरी ठरेल असें वाटतें. निबंध म्हटला कीं त्याचा आशय आणि अभिव्यक्ति या दोहोंचाहि बोध झाला पाहिजे. तो वस्तुनिष्ठ, विचारगर्भ तर असतोच; पण त्याचें व्यक्तीकरणहि ठाशीव, बंदिस्त व परिणामकारक असलें पाहिजे. आपण अभ्यासा-च्या सोयीकरितां आशय व अभिव्यक्ति भिन्न मानल्या तरी वस्तुतः त्या अभिन्नच असतात. तसें नसेल तर लिखाण निर्जीव होईल. जिवंत लेखन-शैलीशिवाय जिवंत विचारप्रगटीकरण अशक्य आहे हें लक्षांत न घेतल्यामुळें गोंधळ होतो. डॉ. मा. गो. देशमुखांनीच संपादन केलेल्या 'गद्यबंध' नामक संग्रहाच्या मलपृष्ठावर पुढील मजकूर आहे.— 'मराठी निबंध' हा विचार समृद्ध असला तरी शैलीच्या बाबतींत तो बहुधा उदासीन असतो. उलटपक्षीं शैलीसंपन्न व कलात्मक लघुनिबंधांकडून विचारवैभव आणि रचनागौरव ह्या गद्यगुणांची अपेक्षा करतां येत नाही. अर्थात् चिपळूणकर-पूर्व-कालीन सकस गद्याचा मनमोकळेपणा, चिपळूणक-रांच्या निबधांतील रचनाबद्ध आशय, आणि फडके—काणेकरांच्या लघुनिबंधांची खेळकर शैली ह्यांचा मनोहर मेळ व सुरेख संगम ज्यांत साधला आहे अशा वैशिष्ट्यपूर्ण गद्य वाङ्मयाची निवड करणें अगत्याचें झालें आहे." " ह्या मराठी वाङ्मयप्रकाराला 'गद्यबंध' ही नवी संज्ञा डॉ. माधव गोपाळ देशमुख ह्यांनी शोधून काढली आहे." " हें अर्थपूर्ण नवें नाणें सर्वत्र प्रचलित होईल असा विश्वास वाटतो." स्वतः डॉ. देशमु-खांनीहि लिहिलें आहे– " अशा लेखांना 'निबंध' या शब्दाला अगदी जवळचा असा 'गद्यबंध' हा नवा शब्द सूचक ठरेल, अशी आशा आहे."

म्हणजेच मराठींत निबंध,--गद्यबंध--आणि लघु-निबंध असे त्रिविध निबंधप्रकार मानावेत अशी त्यांची इच्छा आहे. ह्या वर्गीकरणाला मान्यता देतां येईल असें आम्हांला वाटत नाहीं. ज्या विशिष्ट प्रकारच्या लेखनाला 'गद्यबंध' म्हणावें असें ते सुचवितात तोच 'खरा निबंध' होय; व म्हणूनच



अनुक्रमणिका







मराठी निबंधाची सुरुवात विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी केली असें आम्ही म्हणतों; व साहित्यगुणांचा अभाव असलेल्या चिपळूणकरपूर्व गद्याला 'निबंध' म्हणतां येणार नाहीं असें मानतों. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी सुरूं केलेली ही परंपरा अविच्छिन्नपणें अजूनहि चालू आहे; एवढेंच नव्हें तर ती विकसितहि झालेली आहे. साहित्यगुण म्हणजे सालंकारत्व अशी संकुचित कल्पना आपण बाळगत असलों तर मात्र कांही सुंदर निबंधांत लालित्य नाही असें वाटत असावें ! आमच्या मतें सालंकारत्व हें गद्याला शोभा आणणारें एक प्रसाधन आहे. गद्याची मनोरमता त्याच्या निर्मात्याच्या भावनाशीलतेवर, जिव्हाळ्यावर अवलंबून असते. केशवसुतांनी म्हटल्याप्रमाणे 'हृदयापासून न जे बोल, निघती ते सगळे फोल' हेंच खरें. एखादा गहन विचार मार्मिक, समर्पक पण निरलंकृत शब्दांत मांडून दाखवितां आला व बुद्धिचापल्याची सुखद जाणीव वाचकाला झाली तर ती मांडणी देखील आकर्षक, आल्हाददायक अतएव साहित्यगुणयुक्त होईल असा आमचा भरंवसा आहे.

इ. स. १९२५ नंतर आपण ज्याला लघुनिबंध म्हणतो तो मराठींत जन्मास आला. 'निबंध आणि लघुनिबंध' ह्या दोन वाङ्मयप्रकारांत कांही सापिंड्यसंबंध तर कोठला, पण समानोदक किंबहुना सगोत्रसंबंध देखील दिसत नाही ! ह्या दोहोंतील प्रकृतिभिन्नतेची अत्यंत मार्मिक मीमांसा 'वासंतिका' नामक 'निवडक लघुनिबंधसंग्रहाचे' संपादक श्री.










बि. स. खांडेकर ह्यांनी ' प्रास्ताविकां 'त केली आहे. ती वाचल्यावर कोणाच्याहि ध्यानांत येईल कीं ह्या दोन वाङ्मयप्रकारांना एकाच दावणींत बांधणें सर्वथैव अनुचित आहे. श्री. बा. सी. मर्ढेकर ह्यांनी म्हटलें आहे कीं– " भोंवतालच्या परिस्थितिकडून मेंदूला जे अनेक संदेश येतात ते ज्या अनुक्रमाने येतात त्या अनुक्रमाला मानसशास्त्रीय संगति म्हणतां येईल. त्या विविध संदेशांची–म्हणजे त्या संदेशांच्या विधानार्थांची–त्यांत परस्पर विरोध राहणार नाहीं अशी संगति लावली म्हणजे ती तर्कशास्त्रीय संगति; आणि त्या संदेशांतील इंद्रियसंवेदनात्मक जे असतील त्यांची त्यांच्या गुणानुरोधाने आणि इतरांची त्यांच्या अर्थानुरोधाने फक्त परस्पर सदृश किंवा परस्परविरोधी अशी जुळवणी केली म्हणजे ती सौंदर्यशास्त्रीय संगति." ह्या वचनाधारें विचार केल्यास 'निबंधांतील' विधानांत 'तर्कशास्त्रीय संगतीकडे अवधान विशेषत्वाने पुरविलें असतें; तर ' लघुनिबंधांत ' तें ' मानसशास्त्रीय संगतीकडे अधिक झुकलेलें असतें असें म्हणावेंसें वाटतें. निबंधकार ' वस्तुनिष्ठ ' लेखन करीत असल्याने तर्कसंगत, मुद्देसूद विवेचन करीत असतो, तें तो फुलवून सांगेल पण ही लक्ष्मणरेषा तो ओलांडणार नाही. उलट लघुनिबंधकार ' मानसशास्त्रीय ' संगति राखीत असल्याने ' सैल ' लिखाण करण्यास मोकळा असतो.

" शि. म. परांजपे ह्यांचे कल्पनाविलासात्मक निबंध, कालेलकरांचे प्रवासवर्णनात्मक निबंध किंवा इरावती कर्वे ह्यांचे चिंतनपर निबंध हेहि ' ललितनिबंध ' आणि फडके–काणेकर–दांडेकर ह्यांचे आत्मपर निबंध हेहि ' ललितनिबंधच ' असें म्हणणें थोडेंसें भोंगळपणाचें होईल. " " ह्या बाबतींत थोडा अधिक काटेकोरपणा पाळणें जरूर आहे असें प्रस्तुत लेखकास वाटतें " असा विवेक करणारे खांडेकरच ' लघुनिबंध ' या संज्ञेबद्दल म्हणतात कीं– " ह्या आत्मपर निबंधांच्या बाबतींत हा शब्द पूर्णपणें समर्पक नसेल ' ' कुठल्याहि नांवांत अव्याप्तीचा किंवा अतिव्याप्तीचा दोष सहज दाखवितां येतो. मग लघुनिबंध ह्याच नांवाबद्दल खळखळ करण्यांत काय अर्थ आहे ? " आम्हांस ही विसंगति वाटते; व म्हणून निबंधापेक्षा सर्वच बाबतींत विभिन्न असणाऱ्या ह्या वाङ्मयप्रकाराला डॉ. देशमुखांच्या मताशी सहमत होऊन– ' गुजगोष्ट ' हें प्रा. फडक्यांनी सुचविलेलें अन्वर्थक नांव द्यावें असें आम्ही सुचवितों.

---



अनुक्रमणिका






श्री. हेमचंद्र धर्माधिकारी

# शास्त्राची भाषा

भाषेचें शास्त्र व शास्त्राची भाषा हा भेद सर्वप्रथम ध्यानांत ठेवावयास पाहिजे. भाषेच्यां शास्त्रानें वर्ण, शब्द, वाक्य याशिवाय नाम, विशेषण, विभक्ति, क्रियापद आदींचा विचार करावा लागतो. भाषेची व्युत्पत्ति शोधून काढतांना शास्त्रज्ञ इतर भाषांचाहि अभ्यास करतात. थोड्या थोड्याशा अंतरावर भाषा बदलत असली तरी तिचा मुळचा पिंड कांहीं फारसा बदलत नाहीं. भाषांच्या इतिहासाच्या प्रारंभकाळीं केव्हांतरी त्यांचें व्याकरण निर्माण झालें. प्रत्येक व्याकरणाच्या मागें एक वैचारिक बैठक असते. ( वैय्याकरण्यांनीं कदाचित् हीं बैठक स्पष्ट करून सांगितली नसेल. पण त्या भाषेची लकब ध्यानांत घेतां ती बैठक स्पष्टपणे कळून येऊं शकते. ) यावेळीं हा वैय्याकरणी तत्त्वज्ञ असतो.

## भाषेचा नव्या दृष्टींनें विचार करणें आवश्यक

भाषेचा वापर करतांना आपण आपल्या सोयीसाठीं शब्दांच्या जाति मानतो. सर्व भाषांतून हे जातिप्रकार संख्येनें किंवा स्वरूपानें सारखेच असले पाहिजेत असें नाहीं. ही सर्व वर्गवारी त्या वैय्याकरण्याला विश्व कसें दिसलें यावर अवलंबून आहे. याचा अर्थ सर्व भाषा ही व्याकरणकारानेंच निर्माण केली असा मात्र नव्हें. प्रत्येक भाषेची एक परंपरा असते. तिचा इतिहास असतो. हें सर्व ध्यानांत घेऊनच व्याकरण निर्माण होतें. तिची एक व्यवस्थित घडी लावून देणें हें वैय्याकरण्याचें कार्य होय. भाषा ही विचारांच्या रदलाबदलीसाठीं योग्य व समर्पक व्हावी हा यामागील अर्थ होय. विशेषतः शास्त्रांत तर भाषा विशेषत्वानें कांटेकोरपणें वापरल्या जातात. कांहीं देशांतील शास्त्रें भाषेच्या शास्त्रानुकूलतेमुळें समृद्ध झालीं आहेत. शास्त्रांच्या प्रगतीस अनुकूल अशीं अनेक कारणें असतील परंतु त्यांतहि भाषा हेंहि एक निश्चितपणें महत्त्वाचें कारण होय. कित्येकवेळां शास्त्रांत ज्या अडचणी निर्माण होतात त्या वापरांत असणाऱ्या भाषेच्या अपुरेपणामुळें होय. दुसऱ्या भाषांतून कदाचित् तशा अडचणी दिसणार नाहींत. हे सर्व गोंधळ बहुशः verbal असतात. उदाः कांहीं वेळां क्रियापदें धातुसाधितनामें होतात व प्रश्नांना वेगळ वळण लागतें. हें टाळतां येऊं शकतें. कांहीं लोक प्रत्येक भाषांतून असे दोष टाळून एक Lingua Franca निर्माण करावी असें सुचवितात. परंतु ही आतांपर्यंत एक कल्पनाच राहिली आहे. मूळ प्रश्न आहे तो वेगळाच आहे. एवढें खरें कीं भाषेभाषेच्या समृद्धतेंत फरक असूं शकतो. जर्मन ‘gut’ शब्दांचा अर्थ इंग्रजी ‘good’ मध्यें नाहीं. संस्कृतपंडित ‘धर्म’ शब्दाच्या व्यापक अर्थाबद्दल नेमकें हेंच सुचवितात. हें काम मी शब्दकोषकार किंवा Lexicographess वर सोपवितो. शब्दांना प्रतिशब्द देणें म्हणजे प्रश्न सोडविणें नव्हे. उदा. नवरा = बायको असणार. ब्रह्मचारी = लग्न न झालेला. सर्वांत धाकटी बहीण = वडिलांचे सर्वांत धाकटें स्त्री अपत्य इत्यादि इत्यादि. वरील शब्दकोषकार म्हणचे कांहीं वैय्याकरणी किंवा तत्त्वज्ञ नव्हें. ( तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांतहि असे प्रयोग अजून चालूं आहेत. ) जेव्हां भाषा खरोखरच अपुरी पडेल व वाक्यविचार बरोबर ठरणार नाहीं तेव्हां तो काय करूं शकेल व म्हणूनच मला असें वाटतें कीं भाषेचा विचार नव्या दृष्टीनें झाला पाहिजे.

भाषेची वाढ ही स्वयंभू असते. एखादी भाषा उदाहरणादाखल उचलली तर असें आपणास सांगतां येणार नाहीं कीं ही भाषा सर्वपरी दुसऱ्या भाषांवर अवलंबून आहे. मराठी भाषेचें स्वरूप केवळ संस्कृतजन्यच आहे असें नसून तिच्यांत ‘मराठीपण’ सुद्धां आहे, हें स्वरूप सुद्धां उत्क्रांतिमय आहे. भाषेची वृद्धि अनेक कारणानें होते. कधीं कधीं तिचें स्वरूपहि पालटतें. नाना शब्द जे वापरांत येतात ते केवळ शास्त्रांच्या उपयोगी पडावेत म्हणून जन्माला आलेले नसतात. कांहीं सौंदर्य वाढवितात. कांहीं ध्वनिप्रधान आहेत, काही केवळ विश्वांतील घटनांची सही सही नकल आहेत. तेव्हां भाषा निर्माण होण्या-








मागील प्रेरणा अनेक असूं शकतील व तिच्या वृद्धीचीं कारणेंहि अनेक असूं शकतील. या सर्व शब्दांना भाषिक कार्य (linguistic operation) निर्माण होतें. भाषा ही विचारांतील अदलाबदल करण्याचें उत्कृष्ट साधन आहे. नाहीं पेक्षां रोजचें जीवन मर्यादित होऊन जाईल. पण शास्त्रांचा जेव्हां आपण वेगळा असा विचार करतो तेव्हां हीं सर्व कारणें बिनकामी ठरतात. शास्त्र हें विश्वदर्शन घडवितें. त्याचें माध्यम नेमकें हें कार्य करण्यास समर्थ पाहिजे. पण अनेकवेळां शब्दाचे रूढ अर्थ हें कार्य करूं शकत नाहीत. अशावेळीं त्या भाषेचें व्याकरण बदलावें नाहींतर ती भाषा टाकून द्यावी एवढेंच उरतें. तात्पर्य भाषेचा पुनर्विचार आवश्यक ठरतो. भाषाशास्त्र हें केवळ Form चा विचार करतें. व्याकरण भाषेला सुटसुटीत बनवितें. परंतु अशी समृद्ध भाषाहि परवर्तनशील असते असें नाहीं.

## हल्लीं भाषेच्या अपुरेपणाची पदोपदीं होणारी जाणीव

गेलीं तीन शतकें सर्वच शास्त्रें आपल्या परीनें वाढीस लागलीं आहेत. प्रत्येक शास्त्राची परिभाषा बदलत चालली आहे. जसजशी शास्त्रांची वाढ होत चालली आहे तसतसा सामान्य माणूस त्यापासून दूर चालला आहे. एवढेंच नव्हे तर एका शास्त्रज्ञाला दुसऱ्याच्या शास्त्रांतील कांहीं कळेनासें झालें आहे. आतां विश्वाचें स्वरूप आकलन करून दुसऱ्यास तें समजाविणें पहिल्याइतकें सोपें राहिलेलें नाहीं. या सर्व शास्त्रांना एक तात्विक बैठक निर्माण करून देणें आवश्यक आहे. सोळाव्या शतकांत फ्रांसिस बेकन यानें जें कार्य केलें तें पुनः करणें अगत्याचें आहे. शास्त्रज्ञाचें विश्व निराळें व साध्या माणसांचें जग निराळें झालें आहे. तेव्हां दोघांनीहि आपली परिभाषा तपासून पाहणें हें योग्य होय. शास्त्रज्ञाची भाषाहि भाषाच नव्हे हें जरी खरें असलें तरी पण ज्ञानप्राप्ति त्यांतूनच होते. व आपली बोलभाषा इतकी रूढ व अपुरी आहे कीं त्यांतून शास्त्र सांगणें कठीण आहे. एक भाषा कशी असावी याचें (ideal-language) उदाहरण आहे तर दुसरें भाषा कशी नसावी याचें उदाहरण आहे. हा खरें पाहिलें तर वापरांतील भाषा (usage) व भाषेचा वापर (use) यांतील भेद होय.

भाषा ही अज्ञानामुळें निर्माण झाली असेंहि नाहीं. रोजचे सर्व व्यवहार उत्कृष्ट तऱ्हेनें चालूं आहेत परंतु शास्त्रांसाठीं मात्र ही उपयुक्त ठरत नाहीं. भाषेचें काव्यमयी किंवा सौंदर्यमयी असणें हें शास्त्राच्या काय कामाचें ! ज्याकाळीं एका विशिष्ट भाषेचें व्याकरण निर्माण झालें तें एका विशिष्ट ज्ञानसत्तेवर आधारित असलें पाहिजे. आपण जेव्हां पाणिनिपूर्व व पाणिनिनंतरचें व्याकरण म्हणतों तेव्हां हाच भद आपणास अभिप्रेत आहे. वैदिकव्याकरण किंवा पेशवेकालीन वाक्‌प्रचार हे याचेच योजक नाहींत काय ? ज्ञानक्षेत्रांत अशी प्रचंड उलथापालथ झालेली नाहीं; नाहींतर असाच कांहीं वाक्‌प्रचार आपणास करावा लागला असता. विसाव्या शतकांत असें कांहीं शोध लागले त्यामुळें शास्त्राची भाषा (केवळ शब्दच नव्हे) तपासून पाहावी लागणार. गणितानें जें सत्य कळतें तें भाषेनें कळत नाहीं हा केवढा विसंवाद. दोन्हीहि ज्ञानसाधनें. भाषेचा वापर ज्ञानसाधनेनें आजपर्यंत झाला. ऋषिमुनींना झालेला अव्यक्त ज्ञानसाक्षात्कार इतरांनाहि तसाच्या तसा सांगता यावा म्हणून त्यांनी भाषेचा वापर केला. परंतु आज आपण मात्र गणित व बोलभाषा यांत हिमालय उभा केला आहे. आपलें ज्ञान वाढत चाललें आहे; आपल्या अनुभवाचा अर्थ लावण्याची आपली कुवतहि वाढत चालली आहे. अशावेळीं भाषेंत बदल घडवून आणणें आवश्यकच आहे. प्राणिशास्त्राचा अभ्यास करतांना आपण नवीन नवीन शब्द कुठल्याहि प्रयासाविना आत्मसात् केले, निर्माण केले. गर्भाच्या वाढीच्या विविध अवस्था अनेक निरनिराळ्या शब्दांनीं दाखविल्या.

## शास्त्रभाषा व व्यवहारभाषा भिन्न मानणें आवश्यक

पण कधीं कधीं वापरांत असणारीं वाक्यें सुद्धां अडथळ्यास कारणीभूत होतात त्याचें काय ? उदा : 'खुर्ची अस्तित्वांत आहे' व 'न्यूट्रॉन किंवा इलेक्ट्रान्स अस्तित्वांत आहेत.' म्हणणें सारखेंच कां ? गत्यात्मक अणुशक्तीचें अस्तित्व आहे हें म्हणणें विरोधात्मक नाहीं. एकाच वाक्याचे दोन अर्थ निघणें












निदान इथें तरी इष्ट नाहीं. 'अस्तित्वांत असणें' याला कांहीं तरी निश्चित अर्थ लावणें आवश्यक आहे. 'उद्या सकाळ होणार' हा वाक्यार्थ तरी कसा अस्तित्वांत आला. उद्याचें ज्ञान कसें झालें. शास्त्रांत अशी भोंगळ भाषा चालत नाहीं. आणि आज आईन्स्टाइननें नाना कल्पनांना धक्का लावला आहे. तेव्हां याचा नेमका आपण काय तो अर्थ लावायचा. त्याच्या सिद्धांतामुळें दिशा, काल आदि कल्पनांना धक्का लावला आहे. त्याच्या पूर्वीच्या काळीं ज्या प्रकारचें शास्त्र अस्तित्वांत होतें तशाच प्रकारची परिभाषा निर्माण झाली व नंतर ती रूढ झाली. आतां आईनस्टाईननें Simultaneity च्या कल्पनेला धक्का लावला तर आपण काय तसे शब्द फेकून देणार. आधीं, नंतर, एकाचवेळी असे शब्द असूनहि आपण वापरतो. समजा उद्या एका शास्त्रज्ञानें विद्युत्वेगानें (१८६००० मैल दर सेकंदाला) धावणाऱ्या वस्तूपेक्षा जलद चालणारें यंत्र निर्माण केलें तर मग भूत, भविष्याच्या कल्पनाहि आपणांस बदलून घ्याव्या लागतील. समजा एक यंत्र विद्युत् वेगापेक्षा दुप्पट वेगानें चाललें आहे व मी त्यापासून १८६००० मैलावर उभा आहे. तर अशावेळीं आपल्या सिद्धांतानुसार ती घटना घडायाच्या आंतच आपणांस ती कळावयास हवी. म्हणजे एकतर हे सर्व absurd होय किंवा अगा ! झालेंचि नाहीं तें घडलें असें म्हणणें प्राप्त होय. साधारणतः आपली जी कालासंबंधी कल्पना आहे ती बदलावी लागेल. म्हणजे त्या अनुषंगानें भाषेंतील शब्दहि बदलावे लागतील. आज 'अस्तित्व' कल्पनेचें वर सांगितलें त्याप्रमाणेंच होय. ही कल्पना स्पष्ट झाली नाही तर 'दिशेचें अस्तित्व,' 'अस्तित्वाचें अस्तित्व' असे अनेक वाक्प्रचार रूढ करावे लागतील. उद्यां, परवां, तिथें, पलिकडे ची भाषा शास्त्रांत नसतेच. सर्व 'इथें' व 'आतांचें' असतें. कुठलाहि शास्त्रीय नियम हा वर्तमानकाळीं (किंवा कुठल्याहि काळांत नसलेला) व Inductive mood मध्यें असतो. शास्त्र एकाच काळा – (Tense) चें तर्कशास्त्र वापरीत असतें. हाच मूळ वापरांतील, भाषेंतील व शास्त्रीय भाषेंतील भेद होय. भाषेंत एकत्र शब्द 'मी' 'माझा' 'मला' 'माझ्यामुळें' इत्यादीसारखा चालतो व कुठलें तरी त्याचें मूळ स्वरूप होतें. व तसेंच त्याचें व्याकरण होतें. शास्त्रांतून गणिती चिन्हांचा वापर सुरू झाल्यामुळें हा सर्व घोटाळा टळला आहे.

वरील प्रमाणेंच भाषेचा विचार करतां पुढील तीन पर्याय सुचतात :—

१. गणिती भाषा व सामान्य भाषा वेगळयाच ठेवणें.

२. सामान्य भाषेचें आणखी विश्लेषण करणें (म्हणजे नवीन नामें निर्माण करणें किंवा वस्तु स्वरूपाचें विश्लेषण करणें.)

३. किंवा भाषेचें व्याकरणच बदलवून तिचा गणिती नियमांप्रमाणें वापर करणें.

पर्याय (१) चा विचार महत्त्वाचा वाटत नाहीं कारण त्यामुळें सर्वसामान्य माणसास ज्ञानप्राप्ती होणें शक्यच नाहीं. शास्त्रांत कितीहि वाढ झाली तरी तें सर्व डोक्यावरून जाईल. पर्याय (२) हा अपुरा आहे कारण सर्व भाषा ही जर आपण केवळ वस्तुमात्राचें दर्शनच असेल तर, आपल्या भाषेंत सर्वनामेंच येतील. त्यांतून भाषा नित्योपयोगी राहणार नाहीं. व आधीच भाषा अपुरी आहे. तेव्हां हें विश्लषण काय कामीं पडणार. आपण तिसऱ्या पर्यायाचा स्वीकार केला पाहिजे. शब्दांना अर्थ त्यांच्या वापरांमुळें येतात हा वापर ज्ञानसत्तेवर अवलंबून असतो. शब्दांचा रीतशीर वापर म्हणजेच व्याकरण. तेव्हां व्याकरणाचा नवीन विचार आवश्यक आहे. **वर सांगितल्याप्रमाणें जर आपणास सर्व वाक्यें एकाच काळांत मांडतां आलीं तर आपलीं विधानें शास्त्रोपयोगी होवूं शकतील.** नवें व्याकरण याला कांहीं अर्थ नाहीं. विश्वाचा काय जो अर्थ असेल तो असो, तो समजून घेतांना व समजावून सांगताना याचा फार उपयोग होईल. आपलें व्याकरण तीन काळ व त्यांचीं अनेक स्वरूपें यावर अवलंबून आहे. आपणास जेव्हां ज्ञान होतें तें फक्त जें आहे त्याचें होतें. शक्यतेचा (Probability) सिद्धांत यावरच अवलंबून आहे. उद्या-








च्या कल्पनेंवर नाहीं. भाषेंत असे आणखी किती तरी शब्द आहेत. उदा : तरतमभावाचे शब्द तम असा शब्द वापरांत कसा आला कुणांस ठाऊक; कारण त्यांत absolute a Perfectness ची कल्पना गृहीत आहे. हें ज्ञान कसें होणार. जर तें 'तर' स्वरूपाचें असेल तर मग तो संख्यात्मक भेद आहे गुणात्मक भेद नाहीं. व असें असेल तर सत्यम्, शिवम् व सुंदरम्चीं शास्त्रें म्हणजे पुनः एकदां भाषिक स्वरूपाचींच कोडीं होत. तेव्हां बरेच सर्व प्रश्न शाब्दिक व भाषिक अशा स्वरुपाचे होत.

---










प्रा. मु. गो. देशपांडे

# राष्ट्रीय शिक्षणाचा मूळ ठराव -- व विजापूरकरांचें काँग्रेसमधील भाषण

कै. विजापूरकर यांची राष्ट्रीय शिक्षणाबद्दलची कळकळ त्यांना या प्रयत्नाच्या इतिहासांत अग्रस्थान मिळवून देणारी ठरली आहे. परंतु त्यांनीं केलेल्या कांहीं प्रयत्नांची माहिती दप्तरांतच पडून राहिली आहे. त्यांच्या चरित्रांत किंवा त्यांच्यावरील कोणत्याहि लेखांत ती पूर्णपणें प्रतिबिंबित झालेली नाही. अशी एक निव्वळ दप्तरांतच दडून राहिलेली परंतु अवश्य प्रसिद्ध झाली पाहिजे असें वाटावयास लावणारी गोष्ट म्हणजे कै. विजापूरकर यांचें कलकत्ता काँग्रेसच्या वेळीं झालेलें राष्ट्रीय शिक्षणाच्या ठरावावरील भाषण होय. हें भाषण विजापूरकरांच्या तीनहि चरित्रकारांना उपलब्ध न होण्याजोगी अशी खास अडचण कोणतीहि नसतांना त्यांनीं त्या हकीकतीची उपेक्षा कां करावी हें समजत नाही.

कलकत्याच्या १९०६ च्या अधिवेशनांतील अकरावा ठराव राष्ट्रीय शिक्षणासंबंधींचा होता. ठराव असा होता : 'In the opinion of this congress the time has arrived for the people all over the country earnestly to take up the question of National Education for both boys and girls and organise a system of Education — Literary, Scientific and technical–suited to the requirements of the country, on national lines and under national Control.' (या काँग्रेसच्या मतें आतां असा समय आला आहे कीं देशांतील सर्व लोकांनीं मुलांसाठीं आणि मुलींसाठीं राष्ट्रीय शिक्षण देण्याच्या प्रश्नाचा निकडीनें व अगत्यानें विचार केला पाहिजे. वाङ्मयविषयक, विज्ञानविषयक व तंत्रविषयक शिक्षणपद्धति आपल्या देशाच्या गरजाप्रमाणें, राष्ट्रीय दृष्टिकोनांतून व राष्ट्रीय नियंत्रणाखाली आखली पाहिजे.)

या ठरावावर बोलणारे वक्ते बाबू हिरेन्द्रनाथ दत्त, वेंकटप्पय्या, शंकरन् नायर, चिंतामणराव वैद्य, जे. एन्. रॉय, प्रो. विजापूरकर, मौलवी इस्माइल हुसेन शेराजी व एम्. के. पटेल हे होते.

आमच्या शिक्षणानें मुत्सद्दी, देशभक्त आणि पंडित तयार होत नसून फक्त कारकून निर्माण होतात असें बाबू हिरेन्द्रनाथ दत्त यांनीं आपल्या भाषणांत सांगितलें वेंकटप्पय्या यांनीं या ठरावावर बोलतांना या ठरावाचें वैशिष्ट्य असें सांगितलें कीं या ठरावाच्या योगानें आम्ही सरकारकडे कांहींहि याचना करीत नाही. नाहीतर इतर ठरावांत कांहींना कांहीं याचना किंवा भीकमागेपणा असतो. हा ठराव सरकारच्या मदतीची अपेक्षाच करीत नाही. कारण राष्ट्रीय शिक्षणाचें उद्दिष्ट सरकारच्या चतकोर भाकरीपासून दूर राहूनच स्वतंत्रपणें गांठावयाचें आहे. शंकरन् नायर यांनीं श्रोत्यांना बजावलें कीं हा ठराव ऐकला आणि सोडून दिला असें करून भागणार नाही. प्रतिनिधींनीं आपापल्या प्रांतांत राष्ट्रीय शाळा हिरीरीनें सुरूं केल्या पाहिजेत. चिं. वि. वैद्य म्हणाले कीं, सध्यांची शिक्षणपद्धति पूर्णपणें कुचकामी आहे असें म्हणणें गैर आहे. तसें असतें तर आज आम्ही काँग्रेसमध्येंच आलों नसतों. विशेषतः मुलींच्या शिक्षणांत या राष्ट्रीय दृष्टीची गरज वैद्यांनीं प्रतिपादिली. आणि दानशूर टाटांची आठवण मनांत येऊन वैद्य म्हणाले कीं, ही राष्ट्रीय शिक्षणाची कल्पना त्यांच्या हयातींत जन्माला आली असती तर जन्मतःच ती गर्भश्रीमंत ठरली असती. श्री. रॉय आपल्या भाषणांत म्हणाले, काँग्रेसच्या ठरावांच्या यादींतील या ठरावाला लाभलेलें महत्त्वाच्या निम्यानें देखील महत्त्व इतर कुठल्या ठरावाला नाही. हा ठराव गाजावाजा करून घेणारा नसला तरी अतिशयच महत्त्वाचा आहे. या राष्ट्रीय शिक्षणानें आपल्यांतील वीरवृत्ति जागृत होईल व परिणामांची क्षिति न बाळगतां कठोर व्रतांचा अंगीकार करण्याची आपल्या देशांतील तरुणांना संवय लागेल.

या वक्त्यांच्या यादींत कै. विजापूरकर यांचा समावेश होता. त्यांनीं जें भाषण केलें तें पुढें उद्धृत केलें आहे :






" सरकारच्या प्रयत्नाहून स्वतंत्र असा प्रयत्न देशांतील लोकांना शिक्षणाच्या बाबतींत करावा लागावा ही अवनीतलावरील कोणत्याहि सरकारला भूषणावह गोष्ट ठरेल असें मला वाटत नाही. या ठरावानें असा सरकारहून स्वतंत्र प्रयत्न आपण करीत असून शिक्षण आपल्या हातीं घेत आहोंत. या प्रयत्नातील अडचणी व त्याचें गांभीर्य मला प्रतीत होतें. ज्यांनीं गंभीरपणें त्याचा विचार केला असेल त्यांनाच तें प्रतीत होईल. ज्यांनीं प्रत्यक्ष कामाला हात घातला असेल त्यांनाच त्यांतील अडचणी कळतील. सरकारच्या प्रयत्नाहून स्वतंत्र मार्ग काढण्यांत कोणालाहि म्हणूनच मुळींच आनंद वाटणार नाहीं. सरकार जी सुधारणा करीत नाहीं अगर जें साध्य करूं शकत नाहीं तें आपल्याच प्रयत्नांनीं साध्य करण्याचा हा जो प्रयत्न आपण आरंभीत आहोंत त्याच्या मुळाशीं सध्याच्या सरकारी व्यवस्थेबद्दल असंतोष आहे. म्हणून मला वाटतें कीं अशा रीतीची ही पहिली उपाययोजना असून या कॉंग्रेसनें सर्व बांधवांना आपल्या उद्धाराचा मार्ग आपल्या हातीं घेण्याचें सुचविलें आहे याबद्दल आपणां सर्वांस धन्यता वाटली पाहिजे. एका वक्त्यांनीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें या ठरावांत भीकमागेपणा किंवा याचनेची छटा अजिबात नाहीं. जें आम्ही मागत आहोंत तो आमचा अधिकारच आहे व तसें करण्यांत कसलीहि लाज वाटावयास नको. (Hear, hear), सद्गृहस्थहो, सरकार करूं शकत नाही तें आपण केलें पाहिजे. सरकारनें आपल्यासाठीं सगळेंच करावें अशी अपेक्षा आपल्याला करतां येत नाही. सरकारला कांहीं गोष्टी पाहिजेत; परंतु आपल्याला निराळया गोष्टी पाहिजेत. सरकारला आपला राज्यशकट चालवायचा आहे व म्हणून सरकारच्या स्वतःच्या शाळा आहेत आणि त्यातून सरकारला पाहिजे त्या गोष्टी निर्माण करण्याचें काम सरकार थांबवूं शकत नाही. जिथें सरकारला पैशामुळें म्हणा किंवा अन्य कारणामुळें म्हणा, आमच्या गरजा भागवितां येत नाहींत तिथें सरकारच्या कार्याला आपण जोड दिली पाहिजे. म्हणून सरकारशीं विरोध व्यक्त करावा अशा भावनेनें मी येथें उभा नाहीं. सरकारी नोकरीचा मी द्वेष करीत नाही कारण याच कॉंग्रेसच्या व्यासपीठावरून आपण ठराव करतों कीं सरकारी नोकरींत आमच्या लोकांचें प्रमाण वाढलें पाहिजे. म्हणून सरकारच्या नोकरीला सवंगरीतीनें दास्यशृंखला म्हणणारा माणूस स्वतःच विरोध करतो. म्हणून मी सरकारी नोकरीच्या वैरभावानें हें बोलत नाही. परंतु, सभाजनहो, आपलें स्वतःविषयीं देखील कांहीं कर्तव्य आहे. आपले लोक बलशाली झाले पाहिजेत. देशाची सेवा मनोभावें करणारे असे आपले लोक हवेत. यावेळपर्यंत आपल्या देशांत अगदीं लहानसा वर्ग देशकार्यांत गुंतलेला आहे व तोसुद्धां पूर्णपणें देशकार्यालाच वाहून घेतलेला असा नाही. आपल्याला जे लोक पाहिजेत ते पूर्णपणें समाजाला वाहून घेतलेले असे हवे आहेत व म्हणून जेव्हां आपण सरकारची सेवाहि आमचे सुशिक्षित करतील व निराळया रीतीनें जनतेचीहि सेवा करतील असें म्हणतों तेव्हां दुटप्पीपणें बोलतों. दुसऱ्या कशाकरितां नसला तरी याकरितां तरी आपल्याला असा एक वर्ग हवा आहे कीं जो समाजाचें निरनिराळया व्यवसायांत व चरितार्थाच्या उपक्रमांत नेतृत्व करील. आपल्याला उद्योगधंद्यातील नेते हवेत आणि जीवनाच्या प्रत्येक शाखेतील नेते हवेत. त्या करितां सरकार अशीं माणसें आपल्याला देईल अशी अपेक्षा करतां येत नाही. शिवाय, मी आधीं म्हटल्याप्रमाणें सरकार कांहीं शिक्षितांना नोकरींत घेईल परंतु ज्याला ज्याला सरकार शिक्षण देत आहे त्या प्रत्येकाला कांहीं सरकारी नोकरीची अपेक्षा बाळगतां येणार नाही. म्हणून राष्ट्रीय शिक्षणाच्या या प्रयोगानें शिक्षितांमधील जे बेकार आहेत त्यांच्या प्रश्नाची सोडवणूक झाली पाहिजे. इंग्लंडमध्यें बेकारीचा प्रश्न आहे. इथें सुद्धां बेकारीचा प्रश्न आहे. सभाजनहो, मी आपल्याला फक्त एक उदाहरण देतों. दोन मित्र होते. एक १८९८ सालीं मॅट्रिक झाला व दुसरा याचवर्षीं स्कूल फायनल पास झाला. जो मॅट्रिक झाला त्यानें कॉलेजचा मार्ग धरला व १९०३ सालीं तो बी. ए. झाला. जो स्कूल फायनल झाला त्यानें लगेच सरकारी नोकरीची संधि पटकावली. पण या पदवीधराचें काय झालें ? मी सांगतों. हा पदवीधर पंधरा रुपयावर एका जागीं लागला व आज १९०६ सालीं तो फक्त पंधरा रुपये मिळवीत आहे. ज्यानें



अनुक्रमणिका







शिक्षण लवकर बंद केलें व १८९८ तच शिक्षणाला रामराम ठोकला तो आतां ३५ रुपये मिळवीत आहे व लवकरच तो मामलतदार होईल. यावरून तुमच्या ध्यानीं येईल कीं शहाणपणानें शिक्षण थांबविण्याऐवजीं तें पुढें चालूं ठेवणाऱ्याला ठेंच लागते आणि आमच्या पदवीधरांची ही दशा झालेली आहे. त्यांना यांतून सोडवण्याची आपली इच्छा आहे. महत्त्वाच्या अशा दुसऱ्याहि बाबी आहेत. ( वेळ संपल्याची घंटा झाली व 'वेळ झाली' म्हणून लोक ओरडले ) आम्हांला राष्ट्रीय ध्येयें पुरस्कारावयाचीं आहेत; अगदीं प्रथम आणि अग्रस्थानीं कोणती गोष्ट येत असेल तर ब्रह्मचर्य आम्हांला पुन्हां प्रस्थापित करायचें आहे. राष्ट्रीय शिक्षण किंवा इतर कुठलीहि सुधारणा घडून आली नाही तरी ही गोष्ट पहिल्यानें घडली पाहिजे. जोपर्यंत विद्यार्थी-जीवन आहे तोपर्यंत ब्रह्मचर्य पाळलें पाहिजे. जर निष्ठापूर्वक ब्रह्मचर्य व्रत सुरुं करण्यांत आपणांस यश आलें तर राष्ट्रीय शिक्षणाच्या सर्व प्रयत्नांनीं जें साध्य व्हावयाचें तें आमचें सर्व मनोवांछित साध्य झालें म्हणून समजा ( Hear, hear ) ( यावेळीं पुन्हां घंटी वाजली ) जें आपणांहून वेगळे इंग्रज लोक सध्यां करतात तें आपले लोक करतील काय ? ( 'वेळ झाली' व 'बसा' म्हणून ओरडा ) इंग्रज लोक पदवी संपादन करतात, परीक्षा पास होतात, इकडे सनदी नोकर व अधिकारी म्हणून येतात व मग लग्न करतात. त्यांची शरीरसंपदा पहा. त्यांची शरीरसंपदा तुम्हांला हवी असेल तर राज्यकर्त्यांपासून जरूर हा कित्ता घ्या. त्यांच्याकडून कितीतरी चांगल्या गोष्टी आपण घेतल्या. ते या परदेशी गोष्टीची लाज वाटून घेत नाहींत. इंग्रजांनीं आपली ब्रह्मचर्याची कल्पना घेतली आहे. आतां या बाबतींत त्यांचें अनुकरण आपण करूं या."

या भाषणांतील सरकारी नोकरीविषयींची विजापूरकरांची दृष्टि मोतीलाल नेहरू यांनीं पुढें सध्याचे जनरल थिमय्या यांना जो उपदेश केला त्या उपदेशाशीं तंतोतंत जुळणारी आहे असें 'थिमय्या ऑफ इंडिया' या पुस्तकांतील माहितीवरून कोणालाहि समजून येईल. परंतु मूळ इंग्रजी भाषण फारसें सफाईदार वाटत नाहीं. त्या वर्षीच्या कॉंग्रेसमधील इंग्रजी भाषणांसंबंधीं लिहितांना तेव्हांच्या एका टीकाकारानें असें म्हटलें आहे कीं या वक्त्यांची इंग्रजी भाषा अगदींच बेतशीर व कींव करण्याजोगी होती. ही टीका बहुतेक भाषणांना लागू होण्यासारखी आहे. त्यांतल्या त्यांत विजापूरकरांच्या नंतर बोलणारे वक्ते श्री. पटेल यांना तर वरचेवर मुद्याला धरून बोला असें अध्यक्षांकडून सांगण्यांत आल्याचें दिसतें. परंतु हा सफाईदार इंग्रजी भाषेचा प्रश्न सोडला तर राष्ट्रीय शिक्षणाच्या प्रश्नानें अवघ्या भरतखंडांत जें चैतन्य निर्माण केलें व बंगाल आणि महाराष्ट्र या दोन प्रांतांत तर असीम त्याग करून या जहाल कार्यक्रमाला उधाण आणलें तें कबूल केलेंच पाहिजे. म्हणूनच असें वाटतें कीं महाराष्ट्रांतील राष्ट्रीय शिक्षणाचा इतिहास लिहिला गेला तेव्हां या मूळ ठरावाची माहिती, त्या ठरावावरील विजापूरकरांचें भाषण वगैरे गोष्टींचा अन्तर्भाव त्या इतिहासांत व्हावयास पाहिजे होता. कै. आपटे गुरुजींनीं निष्ठेनें आणि कार्याबद्दलच्या उत्साहानेंच हा इतिहास त्यांच्या अखेरच्या दुर्बल अवस्थेंत लिहिला हें आपलें सुदैव. साहजिकच त्यांत कांहीं उणीवा राहून गेल्या. तशा त्या पुरस्कार लिहिणाऱ्या दत्तोपंत पोतदारांनीं दाखवून दिल्याहि आहेत, पण यामध्यें सुद्धां कॉंग्रेसच्या सहा सालच्या ठरावाचा उल्लेख अभिप्रेत आहे असें वाटत नाहीं. म्हणूनच एक उपयुक्त अस्सल वस्तु विजापूरकरांच्या वैयक्तिक माहितींत भर घालण्याकरितां व राष्ट्रीय शिक्षणाच्या प्रयत्नाचें विवेचन ठरावरूपानें सुरुवातीला कसें झालें हें दाखविण्याकरितां वाचकांपुढें ठेवीत आहे. समर्थ विद्यालय बंद झालें त्याविषयींची आतां उपलब्ध झालेली माहिती पुढें केव्हां तरी मराठी वाचकांच्या नजरेला आणण्यासारखी आहे.



अनुक्रमणिका








## वाचकांचा पत्रव्यवहार –

रा. रा. संपादक, **नवभारत**, यांस

कोणत्याहि विशिष्ट सांस्कृतिक परंपरेवर टीका करणें म्हणजे कोणाचा वैयक्तिक उपमर्द करणें नव्हे, कारण कीं विचार आणि संस्कृति यांच्या मूल्यमापनांत मतभेदास स्थान आहे. परंतु श्री. द्रविड यांची भूमिका अशी दिसते कीं हिंदु सांस्कृतिक परंपरेबद्दल कोणी प्रतिकूल शब्द काढूं नये; तसें कोणीं केलेंच तर तो मनुष्य उथळ आणि बौद्धिक प्रामाणिकता नसलेला असावयास पाहिजे.

मौज अशी कीं श्री. द्रविड इतर **व्यक्तींवर** वाटेल तसें तोंडसुख घेतांना विचार करीत नाहींत. परंतु इतरांनीं हिंदुसांस्कृतिक **परंपरेवर** –श्री. द्रविड यांच्यावर नव्हे– ओझरती टीका केली तर तो अक्षम्य गुन्हा ठरतो; एवढा मोठा गुन्हा कीं टीकाकार "कांहीं गैरसमज निर्माण करण्याचा **बुद्धिपुरस्सर** प्रयत्न" करीत आहे, असें म्हणतांनां त्यांनां कांहीं वाटत नाहीं. ( जाड ठसा माझा – अ. मि. श. ). एका दृष्टीनें यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. उलट, जी सांस्कृतिक परंपरा आपल्या पुरस्कर्त्यांस आगरकर जिवंत असतां त्यांची तिरडी काढावयास प्रवृत्त करते, तिच्या भक्तानें प्रतिपक्ष्यावर केवळ बौद्धिक अप्रामाणिकतेचा आरोप करून थांबणें, ही प्रगतिच समजली पाहिजे.

परंतु भारतीय संस्कृतींत दुसरी एक परंपरा आहे आणि तिच्याबद्दल अनेक आधुनिकांनां आदर वाटेल. ही परंपरा मण्डनमिश्राची होय. या परंपरेंत वादाचा उद्देश फड जिंकण्याचा नसून सत्यान्वेषण हा असतो. भारतीय संस्कृतीच्या दुर्दैवानें 'सनातन धर्मा'चा विजय होऊन मण्डनमिश्राची परंपरा लुप्तप्राय झाली. हिंदु संस्कृतीचें योग्य मूल्यमापन व्हावें असें मनापासून वाटणाऱ्यानीं ही परंपरा पुनः जिवंत करण्याचे प्रयत्न केले पाहिजेत; असें मला वाटतें. प्रा. द्रविड यांच्याविषयीं मला आतां कांहींच म्हणावयाचें नाहीं.

चर्चेच्या इष्ट स्वरूपाबद्दल श्री. द्रविड यांची भूमिका आतांपर्यंतचीच असली तर त्यांच्याशीं गणितशास्त्राच्या तात्त्विक बैठकीबद्दलहि वाद वाढवण्यांत अर्थ नाही. म्हणून केवळ दोन तीन मुद्यावर माझें मत थोडक्यांत सांगून माझ्यापुरती ही चर्चा तूर्त या पत्राबरोबर थांबवितो.

गणितशास्त्राच्या तात्त्विक बैठकीवर रसेलच्या पुस्तकानंतर गेल्या सत्तावन वर्षांत प्रसिद्ध झालेल्या **पुस्तकांचा** आणि पुढें आलेल्या **विचारप्रणालींचा** उल्लेख श्री. द्रविड यांच्या लेखांत नाहीं. तसेंच मी उल्लेख केलेल्या तीन प्रमुख विचारप्रणालींशीं त्यांचा नेमका मतभेद कोठें आहे, याचें स्पष्ट विधान त्यांनीं केलेलें नाहीं–असा माझा आक्षेप होता. राम्से याचें Foundations of Mathematics, ब्लॅक याचें Nature of Mathematics, विल्डर याचें Foundations of Mathematics यांचा, किंवा कार्नेप, हिल्बर्ट, हंटिंग्टन, चर्च, मॉरिस, राइशन्बाक् इत्यादींच्या एकाहि ग्रंथाचा उल्लेख न करतां, Mind सारख्या त्रैमासिकांत **विज्ञानाधिष्ठित** तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत कोणी विचारीत नसलेल्या लेखकांच्या लेखांकडे बोट दाखवून उपयोग नाहीं. तसेंच गणिताच्या तात्त्विक बैठकीच्या स्वरूपाबद्दल प्रचलित असलेल्या तीन्हीं विचारप्रणालींशीं आपलें थोडेंथोडें जुळतें, असें म्हणूनहि चालणार नाहीं; कारण असें कीं या तीन्हीं विचारप्रणाली कांहीं मूलभूत प्रश्नांवर परस्परांशीं विसंगत आहेत.

गणिताचा काटेकोरपणा स्वीकारल्यानंतर तत्त्वज्ञानाचे कांहीं महत्त्वाचे प्रश्न सुटले आहेत याचें उदाहरण माझ्या मूळ पत्रांत आहे. अधिक प्रश्नांची नामावलि देतां येईल, परंतु मागें सांगितलेल्या कारणास्तव तसें करीत नाहीं.

शेवटचा मुद्दा थोडा नाजुक आहे, आणि म्हणून त्याबद्दल श्री द्रविड यांनीं वैयक्तिक स्वरूपाचा गैर-



अनुक्रमणिका








समज करून घेऊं नये अशी अगोदर विनंति करणें आवश्यक आहे. तो मुद्दा असा– गणिताचा प्राध्यापक गणिताच्या तत्त्वज्ञानांतहि पारंगत असावा लागत नाहीं. कोणत्याहि शास्त्राचा आंतरिक विकास करणें आणि त्याचा इतर शास्त्रांशीं सुसंवादी संबंध जुळवण्यास आवश्यक असणारें त्यांचें तात्त्विक समीक्षण करणें, हीं दोन भिन्न स्वरूपाचीं कार्यें आहेत. पदार्थविज्ञानाच्या बाबतींत हें उघड आहे : सर जेम्स-जीन्स आणि सर आर्थर एडिंग्टन यांच्यासारखे जगप्रसिद्ध पदार्थवैज्ञानिक आपल्या शास्त्राची तात्त्विक मीमांसा करतांना स्वतःचें हंसें करून घेत होते, हें विज्ञानाधिष्ठित तत्त्वज्ञानाच्या विद्यार्थ्यास परिचित आहे. * आधुनिक पदार्थविज्ञानाचा ज्ञानमीमांसेशीं इतका जवळचा संबंध असूनहि असें होणें जर शक्य असेल, तर गणितासारख्या विषयाच्या बाबतींत तर हें स्वाभाविक समजलें पाहिजे. याचा अर्थ असा नव्हे कीं एखादी विशिष्ट व्यक्ति गणिताच्या तात्त्विक अधिष्ठानाबद्दल बोलण्यास अनधिकारी आहे. असा अधिकार तिला आहे कीं नाहीं हें ती काय बोलते यावरून ठरेल, ती व्यक्ति एकेकाळीं गणित शिकवीत होती आणि त्याविषयावर प्रबंध वाचीत होती यावरून नव्हे. नाहींतर श्री. द्रविड यांच्यापेक्षा गणिताबद्दल बोलण्याचा अधिकार प्रस्तुत पत्रलेखकाला जास्त आहे असें म्हणावें लागेल. परंतु ही वाद करण्याची इष्ट पद्धति म्हणून मान्य होऊं नये असें मला वाटतें–आणि श्री. द्रविड यांनाहि तसेंच वाटेल असा माझा विश्वास आहे.

१०।१०।१९६० —अ. भि. शहा.

---

## पुरुषसूक्त व उपनिषदें

श्री. ना. गो. चापेकर यांचा या महिन्याच्या नवभारत मासिकांतील पुरुषसूक्तावरील लेख संक्षिप्त परंतु उत्कृष्ट संशोधनाचा नमुना आहे. पुरुषमेधाचाच चयननामक यज्ञसंस्था हा विकसित विस्तार आहे, असें अनुमान करण्यास आधार यजुर्वेदाच्या सर्व संहिता – तैत्तिरीय, कपिष्ठल, काठक, मैत्रायणी वाजसनेयी–आणि यजुर्वेदाचीं तैत्तिरीय व शतपथ हीं ब्राह्मणें होत. पुरुषमेधाचा द्रष्टा व यजमान नारायण ऋषि होय; सर्वात्मकता व सर्वातीत अमरता प्राप्त व्हावी या कामनेनें प्रेरित होऊन नारायणानें आत्मयज्ञ=पुरुषयज्ञ अनुष्ठिला. चयनकर्मांतील श्येनादि आकाराचीं इष्टकाचयनें सर्वात्मक पुरुष या स्वरूपाने चयनकर्मांत स्तविलीं आहेत असें संहिता–ब्राह्मणग्रंथांवरून दिसून येतें. सर्वात्मक पुरुषरूपकाचें वर्णन करणाऱ्या सूक्ताचा द्रष्टा शतपथांत म्हटल्याप्रमाणें सर्वात्मकता व अतीतता या फलाची कामना करणारा नारायण होय, असें म्हटलें तर सुसंगत ठरतें. चयनकर्मांतील पुरुषमेधाचें प्रत्यक्ष मनुष्यबलीरूप स्वरूप नष्ट करण्याच्या प्रयत्नानें प्रेरित झालेल्या सुधारक ऋषींनीं विश्वात्मक देवाची वैश्वानर म्हणून म्हणजे विश्वात्मक पुरुष म्हणून उपासना हें रूप देण्याचा प्रयत्न केला. छान्दोग्य व बृहदारण्यक उपनिषदांत वैश्वानर उपासना आली आहे. हें त्या प्रयत्नाचेंच फल आहे. तैत्तिरीय उपनिषदांतील आनंदवल्लींतील अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय पुरुष हा विश्वात्मक आहे व तो चयनांतील पक्षिपुरुष आहे, याची दखल प्रथमच आम्ही धर्मकोशाच्या उपनिषत् काण्डाच्या आरंभीं प्रस्तावनेंत घेतली आहे– शंकराचार्यांपासून मॅक्समुलर, राधाकृष्णन् पर्यंतच्या कोणीहि उपनिषद्-चिंतकांनीं आनंदवल्लीतील अन्य प्राणमनोविज्ञानानंदमय पुरुषाला चयनपुरुष म्हणून ओळखूनमीमांसा करावयास पाहिजे होती, हा एक धर्मकोशकारांच्या संशोधनांतील नवा मुद्दा आहे; उपनिषद्विचारांच्या ऐतिहासिक मीमांसेचें हें महत्त्व जोंपर्यंत उपनिषचिंतक ध्यानांत घेणार नाही तोंपर्यंत ऐतिहासिकदृष्ट्या त्याची मीमांसा अधुरीच राहील.

—लक्ष्मणशास्त्री जोशी

---

* उदा० पहा : Philosophy and the Physicists – Susam Stebbing.








रा. रा. संपादक, नवभारत यांस,

'नवभारता'च्या सप्टेंबर महिन्याच्या अंकांत श्री. ल. द. बेंबळकर यांचा 'भवभूतिसंबंधी कांहीं नवीन माहिती' या शीर्षकाचा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांतील बरीचशी माहिती केवळ काल्पनिक दिसते. ज्या कांहीं प्रश्नांविषयी अद्यापि संशोधन झालें नाही असें ते म्हणतात त्यांची सविस्तर चर्चा यापूर्वीच होऊन गेली आहे. त्यांविषयी थोडक्यांत माहिती येथें देत आहे : 'उदुंबर' नाम– याविषयी चर्चा आमच्या संशोधनमुक्तावलि, सर २, पृ. ४१–४५ आणि सर ३, पृ. १४ यांवर सांपडेल. श्री. बेंबळकर समजतात त्याप्रमाणें उदुंबर हें भवभूतीचें गोत्रनाम नव्हतें. त्याचें गोत्र काश्यप होतें. उदुंबर हें त्याच्या पूर्वजांच्या आरंभींच्या निवासस्थानावरून पडलेलें नांव दिसतें. हें उदुंबर विदर्भाच्या यवतमाळ जिल्ह्यांतील पैनगंगा नदीच्या तीरावरील उमरखेड असावें. उमरखेड येथे भवभूति पूर्वी तेथे होऊन गेला अशी आख्यायिका अद्यापि प्रचलित आहे.

श्री. बेंबळकरांनी भवभूति दक्षिणेकडील पद्मपुरचा रहिवासी होता असें म्हटलें आहे पण मालतीमाधवांत 'अस्ति दक्षिणापथे विदर्भेषु पद्मपुरं नाम नगरम्' असा त्याच्या देशाचा स्पष्ट उल्लेख आहे त्याकडे त्यांचें लक्ष गेलेलें दिसत नाही. हें पद्मपुर विदर्भाच्या भंडारा जिल्ह्यांतील आमगांवाजवळ अद्यापि प्राचीन नांवाने प्रचलित आहे आणि तेथें बरेचसे प्राचीन अवशेषहि आहेत. यासंबंधीं सविस्तर माहिती 'संशोधन मुक्तावलि', सर १, पृ. ७६–९४ यावर सांपडेल.

जातूकर्णीपुत्र– 'इतर कोणत्याहि संस्कृत ग्रंथकर्त्यांने आपल्या आईचें नांव अशा प्रमुख स्वरूपांत दिलें नाहीं तेव्हां ही पद्धति भवभूतीने जैन लोकांना अनुसरून केली असावी' हा श्री. बेंबळकरांचा तर्क अनाठायी आहे. बाणाने आपल्या पूर्वजांचीं व मातापित्यांचीं नांवें भवभूतिप्रमाणें दिलीं आहेत.

उम्बेक– भवभूति आणि उम्बेक एक होत अशी समजूत दीर्घ काल प्रचलित होती, पण ती निराधार आहे. यासंबंधी सविस्तर चर्चा संशोधनमुक्तावलि, सर ३, पृ. ४३-६१ ('भवभूति आणि उम्बेक' या लेखांत) सांपडेल.

कालप्रिय– 'कालप्रियनाथाचें देऊळ यमुनेच्या कांठीं असलेल्या महोदय म्हणजे कनोज नगरांत होतें' असें श्री. बेंबळकर म्हणतात. पण कनोज प्राचीन काळीं गंगानदीच्या उजव्या तीरावर होतें. आता गंगानदीचा प्रवाह तेथून बराच दूर गेला आहे. कालप्रिय हें कनोज असणें शक्य नाहीं, कारण कालप्रिय यमुना नदीच्या कांठीं होतें. कालप्रिय येथे यमुनानदी पार करून नंतर इंद्र राजाने महोदय (कनोज) वर स्वारी केली असें चतुर्थ गोविंदनृपतीच्या सांगली व खंबायत येथे सांपडलेल्या ताम्रपटांत म्हटलें आहे. तेव्हां कालप्रिय हें कनोज नव्हे. त्याचें सध्याचें नांव काल्पी. हें यमुनेच्या तीरावर वसलें आहे. तेथील अनेक टेकाडें उत्खननाची वाट पाहत आहेत. यासंबंधी विवेचन संशोधनमुक्तावलि सर १, पृ. ९५-१०३ यांवर सांपडेल.

श्री. बेंबळकर यांनी भोजराजाच्या शृंगार मंजरींतील 'भगवतः कालप्रियदेवस्य मधुसमययष्ठीयात्रायां आत्तकमनीयवेषः तं एव भगवन्तं प्रेक्षितुं अयासीत्' असा कालप्रियदेवाबद्दल उल्लेख दिला आहे आणि त्या देवाच्या चैत्रवैशाखांतील यात्रेच्या वेळीं **काठ्या** वापरीत असत असें अनुमान केलें आहे. वरील उताऱ्यांत '**यष्ठी**' हें '**षष्ठी**' असावें. तसें असल्यास तो वसंतषष्ठीचा उत्सव असेल. सध्या वसंतपंचमीस उत्सव केला जातो.

भवभूति आणि राष्ट्रकूट : राष्ट्रकूट वैदिकमतविरोधी होते म्हणून भवभूति वैदिकधर्मानुयायी कनोजनृपति यशोवर्म्याकडे गेला असावा असें अनुमान श्री. बेंबळकरांनीं केलें आहे त्याला कांही आधार नाही. भवभूति खिस्तोत्तर आठव्या शतकाच्या प्रथमार्धांत










होऊन गेला असें मानण्यांत येतें. निदान तो खिस्तोत्तर ७०० च्या अगोदर झाला नसावा. ( कै. डॉ. भांडारकरांची मालतीमाधवाची आवृत्ति पाहा. ) या कालांत महाराष्ट्रांत दन्तिदुर्ग नांवाचा बलाढ्य राजा राज्य करीत होता. याच्या काळचे तीन ताम्रपट सांपडले आहेत. त्यांपैकी दोन ताम्रपटांत त्याने ब्राह्मणांना ग्रामदाने दिल्याचा निर्देश आहे. तिसऱ्या ताम्रपटांत ब्रह्मदेवाच्या देवळाच्या डागडुजीकरिता महाजनसभेने गांव दिल्याचा उल्लेख आहे.

याशिवाय वेरूळ येथील दशावतार लेणेंहि याने कोरविलें होतें. तेथे त्याचा लेख आहे. या लेण्यांत अनेक हिंदु देवतांच्या मूर्ति आहेत. त्याच्यानंतर गादीवर आलेल्या प्रथम कृष्णराजाने पर्वतांतून कोरविलेलें 'कैलास' हें शिवमंदिर जगांतील आश्चर्यांत गणलें जातें. तेव्हा भवभूति उत्तरेंत गेला याचें कारण तत्कालीन राष्ट्रकूटनृपति वैदिकमतविरोधी होता हें असणें शक्य दिसत नाहीं.

**— वा. वि. मिराशी**

---

## पुस्तक-परामर्श –

### लोकहितवादींचीं शतपत्रें –

[ संपादक डॉ. नारायण रघुनाथ इनामदार एम्. ए. पी. एच्. डी. कॉन्टिनेन्टलप्रकाशन पुणें २. ]

मराठींतील अद्ययावत् विचारांचें आद्य व हृद्य गद्य म्हणून "लोकहितवादींचीं शतपत्रें" मराठी साहित्यांत चिरंतर राहतील, यांत शंका नाहीं कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांना मराठी गद्याचे श्रेष्ठ व आद्य लेखक म्हणून मान दिला जातो व ते त्या दृष्टीने मानार्हहि आहेत याबद्दल शंका घेण्याचें कारण नाही; परंतु उठावदार भाषाशैली निर्माण करण्याचा हेतु निबंधमालेच्या लेखकाच्या हृदयांत वसत आहे, याच्या खुणा त्यांत जागोजागीं दिसतात; निबंधमालेच्या संपन्नशैलीचा एक भाग त्या बनल्या आहेत. शतपत्रांचें तसें नाहीं. लोकहितवादींचें गद्य हें तसें शैलीकरतां लिहिलेलें नाहीं. तें ह्यादृष्टीनें निर्हेतुक आहे. **पारतंत्र्याच्या बंधनांत नुकत्याच सांपडलेल्या** अवनतीच्या व्यथेनें ग्रासलेल्या व त्यामुळेंच राष्ट्राच्या अधोगतीचें दारुणचित्र पाहून करुणावश झालेल्या व्यक्तीनें विवेकबुद्धीनें प्रेरित होऊन या दारुण स्थितीचें निदान केलं. हें निदान उदारधी भिषग्वराप्रमाणें निःपक्षपाती दृष्टीनें केलें. सांगितल्याशिवाय रहावत नाहीं म्हणून केवळ सत्य सांगण्याचा प्रयत्न केला. गंभीर मननाच्या योगानें तें सत्य परजलेल्या शस्त्राप्रमाणें चमकदार दिसतें. व्यक्त करणें अपरिहार्य वाटलें म्हणून विचार लिहिले. या विचारांत तळखपणा होता. त्यामुळें लेखनांत सहजता व सुगमता आली. सत्य सांगण्याचा हेतूच प्रेरक झाल्यामुळें निर्भीडपणा आला. लोकप्रगतीची तळमळ असल्यामुळें जनमताची प्रतिक्रिया काय होईल. याची फिकीर न बाळगतां जें पटलें तेंच लिहिलें. ऐतिहासिक तत्त्वज्ञानाची कसोटी लावून भारतीय अवनतीची मीमांसा करणारा असा हा शतपत्रात्मक निबंध आहे. भारताच्या व विशेषतः महाराष्ट्राच्या सामाजिक सुधारणेच्या चळवळीची प्रारंभसीमा दाखविणारा असा हा शतदीपांचा उच्चतम स्तंभ आहे! दैनंदिन जीवनाच्या प्रवाहांत सहज जें सुचत गेलें तें लिहिलें; असं पत्रात्मक लेखन असतें. तशीं हीं पत्रें नाहींत. शतपत्रांची शैली पत्रलेखनास अनुरूप अशी नाहीं. शैलीच्या दृष्टीनें गंभीर अशा स्फुट विचारांचा सुटा एक एक परिच्छेद म्हणजे पत्र, असें यांत दिसतें; वैचारिकता हा त्याचा गाभा असल्यामुळें पत्रशैली त्यांत येऊं शकली नाहीं.

डॉ. ना. र. इनामदार यांनीं या ग्रंथाचें संपादन चांगल्या साक्षेपानें केलें आहे. त्यांनी विद्या, ब्राह्मण, धार्मिक, सामाजिक, राजकीय, नेटिव्ह अंमलदार व आर्थिक, अशी सप्त प्रकरणात्मक वर्गवारी या शतपत्रांची केली आहे. त्यामुळें हा शतपत्रात्मक निबंध ऐतिहासिक तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें भारताच्या अवनतीची सर्वांगीण मीमांसा करणारा ग्रंथ आहे अशी जाणीव त्वरित होते. इतकी इंग्रजपूर्व भारतीय संस्कृतीची पाश्चात्य संस्कृतीशीं अग्निपरीक्षेसारखी केलेली तुलनात्मक मीमांसा भारतीय भाषांमध्ये थोडीच सांपडेल.

सुधारणावादाचा काल राजा राममोहनरायांपासून सुरू होतो. त्यानंतर ५० वर्षे होतात न होतात तोंच भारतांत राष्ट्रवादाचा उदय होऊन त्याचा प्रभाव जाणवूं लागला. भारतीय काँग्रेसची स्थापना करणारे भारतीय समाजसुधारक होते तरी त्यांनीच राष्ट्रीय अभिमानाची ही मुहूर्त–मेढ रोवली. महाराष्ट्रांत केसरी वृत्तपत्रसंस्थेची स्थापना झाली आणि राष्ट्रवादाचा प्रखर प्रभाव जाणवूं लागला. राष्ट्रवादाच्या मुळाशीं राष्ट्रीय स्वाभिमान किंवा सामुदायिक अहंता असते. या अहंतेच्या प्रकर्षाबरोबर हळूं हळूं आत्मनिरीक्षणात्मक विवेचक बुद्धीचा अपकर्ष होऊं लागला. मागासलेपणाची घृणा, स्वाभिमानाच्या प्रखरतेमुळें वर तोंड काढेनाशी झाली. आमची समाज पद्धति, आमच्यांतील ब्राह्मणी वर्चस्व, खुरटलेल्या परंपरागत विद्या व कला, लोकभ्रमांचा व अंधश्रद्धेचा पगडा, जातिभेदाचें स्तोम, अस्पृश्यतेसारखी मानव्याला लाजविणारी गुलामगिरी, स्त्रियांचें मानसिक पारतंत्र्य इत्यादि सामाजिक अधोगतीचीं कुलक्षणें तीं अवनत समाजाचीं लक्षणें होत असें शुद्ध विचाराच्या भूमिकेवरून मान्य करण्याचें मनोधैर्य आपणांत आलें नाहीं. उलट हें पराभूत मनोवृत्तीचें लक्षण होय, असें राष्ट्रवादी चळवळीमुळें मानलें जाऊं लागलें. सर्वांगीण समाजसुधारणेच्या दृष्टिकोणाचें समर्थन करणारी लोकहितवादींसारख्या समाजसुधारकांनीं प्रवृत्त केलेली विचारसरणी सांगणाऱ्या सुधारकांना गेल्या १५० वर्षांत ब्रिटिश अंसेपर्यंत समाजाचा दृढ पाठिंबा फारसा मिळाला नाहीं. राजकारणांत राष्ट्रवादाच्या भूमिकेवर उभे राहिलेले अनेक राष्ट्रीय नेते बुद्धिवादी किंवा समाजसुधारक होते परंतु, त्यांचें राष्ट्रीय नेतृत्व राजकीय होतें, सामाजिक नव्हतें; म्हणजे सामाजिक सुधारणेच्या दृष्टिकोणामुळें त्यांना तें नेतृत्व आलें नव्हतें. मौलिक व सर्वांगीण समाजसुधारणेच्या बुद्धिवादी दृष्टिकोणाचें अधिष्ठान येथील स्वातंत्र्याच्या चळवळीला लाभलें नव्हतें. सामाजिक सुधारणा ही दुय्यम किंवा गौण समजूनच राजकीय चळवळीनें सामाजिकसुधारणा मार्गे रेटली होती. त्यामुळें येथील स्वातंत्र्याची चळवळ यशस्वी जशी होऊं लागली; स्वातंत्र्य जसजसें जवळ येऊं लागलें, तसतशा मूलगामी सामाजिक परिवर्तनाची पार्श्वभूमि राजकीय चळवळीला न लाभल्यामुळें विशिष्ट अडचणी उत्पन्न झाल्या; व त्या अडचणी बळावूं लागल्या. हिंदुस्थानचें विभजन हा राष्ट्रीय चळवळींतील बुद्धिवादी सामाजिक दृष्टिकोणाच्या दौर्बल्याचाच परिणाम होय. परंपरागत धर्मसंस्था व परंपरागत सामाजिक संस्था ह्या एकरूप असतात. हिंदु व मुसलमान यांच्या धार्मिक व सामाजिक परंपरेचें द्वैत दृढ राहिल्यामुळेंच विभजनहि अपरिहार्य झालें. तें परंपरागत द्वैत शिथिल करण्याचें सामर्थ्य राष्ट्रीय चळवळीच्या मुळाशींच नव्हतें. मूलगामी समाजपरिवर्तनाचा बुद्धिवादी दृष्टिकोण हाच मुळाशी नव्हता. नवबुद्धांची नवी चळवळहि याच राष्ट्रीय चळवळींतील दौर्बल्याचा दुर्विपाक होय. लोकहितवादींपासून प्रवृत्त झालेली ऐतिहासिक मीमांसा जर प्रभावी झाली असती तर काय झालें असतें याचें हें व्यतिरेकात्मक विवेचन होय.

डॉ. ना. र. इनामदार यांनी या ग्रंथाला उत्कृष्ट विवेचनात्मक अशी ६७ पृष्ठांची प्रस्तावना लिहिली आहे. या प्रस्तावनेत लोकहितवादींच्या चरित्राची रूपरेषा आली आहे. त्यांच्या कालखंडांतील धार्मिक, सामाजिक व राजकीय वातावरण व त्याकाळांतील आधुनिक विद्याविभूषित नामवंत व्यक्ति यांचा परामर्श तुलनात्मक दृष्टीने संपादकानें घेतला आहे. एकंदरीत लोकहितवादींच्या काळाचें सुस्पष्ट चित्र या प्रस्तावनेत पहावयास मिळतें. लोकहितवादींचे मुख्य टीकाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचेंहि तुलनात्मक अध्ययन करून, लोकहितवादींचें योग्य समर्थन व लोकहितवादींचें कार्य कथन केलें आहे. 'लोकहितवादी वैचारिक क्रांतीचे नेते' कसे याचें पद्धतशीर विवरण केलें आहे. शतपत्रांचा संपूर्ण अन्वयार्थ लागण्यास उपयुक्त अशी ही प्रस्तावना आहे. शतपत्रांचें संपादन करतांना संपादकांनी क्रमांक १०० चें पत्र " शतपत्रांचा इत्यर्थ " हें प्रारंभी देऊन चांगलेंच औचित्य प्रकट केलें आहे. उत्कृष्ट संपादनाबद्दल व सुंदर प्रकाशनाबद्दल संपादक व प्रकाशक यांना अनुक्रमें वाचकांतर्फे धन्यवाद देणें हें कृतज्ञतेचें दर्शक ठरेल.

— लक्ष्मणशास्त्री जोशी













श्री लाच्या **विश्वसनीय, कार्यक्षम** आणि **जलद**

वाहतुकीचें आश्वासन हाच सर्वोत्कृष्ट **संदेश** आम्हीं आपणांस

**दीपावली**च्या शुभ प्रसंगी देत आहोंत.

## मध्य आणि पश्चिम रेल्वे









अनुक्रमणिका

# काशीयात्रेहून लवकर परत या हं...!

"येतांना आम्ही दिल्ली-आग्रा व भाक्रा-नांगलहि बघून येणार आहोंत, तुम्ही राजूला जपा हं, शक्य तो लवकर येतोच" असं म्हणतांना आजोबांना नॅशनल सेव्हिंग्ज सर्टिफिकेटांत पैसे गुंतविल्याचं समाधान वाटत होतं तरुण वयांत जस जसं जमेल तस तसं करून नॅशनल सेव्हिंग्ज सर्टिफिकेटें घेण्याची संवय त्यांनीं लावून घेतली होती. त्या पैशातून त्यांना किती तरी गोष्टी करतां आल्या मुलीच्या लग्नाच्या वेळीं पैसा उभा राहिला. मुलाचं शिक्षण झालं नी आज काशी यात्रा!

खरंच, वचत करण्याचा सर्वांत सोपा नी फायदेशीर उपाय म्हणजे—नॅशनल सेव्हिंग्ज सर्टिफिकेटं १० रुपयांचे अवघ्या बारा वर्षांत १६·५० रुपये होतात एक वर्षानंतर केव्हांहि ती मोडतां येतात किंवा ती तारण ठेवून त्यावर कर्जहि घेतां येतं म्हणून शक्य असेल तेव्हां व तेवढी रक्कम नॅशनल सेव्हिंग्ज सर्टिफिकेटात गुंतवा.

## नॅशनल सेव्हिंग्ज् सर्टिफिकेटस्

घेऊन बचत करा व स्वतःचे आणि राष्ट्रहितहि साधा.

तुम्ही गुंतविलेल्या पैशातून सरकार विकास योजनांसाठी पैसा देते.




pratibl.

प्रकाशन संचालक, महाराष्ट्र सरकार, मुंबई.

अनुक्रमणिका